


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन








अनुक्रमणिका

साहित्य
कला-संगम

# दीपावली

कथा विशेषांक • जून '६३

## श्रेयनामावलि—

- **सहा कथा** :—**तोल**—मनोहर तल्हार, **एकत्र गुंफुन जीवित धागे**—पद्माकर गोवईकर **मी नाजुक आहे**—माधवी बिडकर, **वीर्यशुल्का**—जनार्दन सातव, **चंदन**—शान्त **आजोबांचा पलंग कोसळला तेव्हां**—वि. रा. भाटकर.
- **चालू कादंबरी** :—**भीष्माचा डोंगर**—श्रीराम कामत यांच्या चालू कादंबरीचें नवें पण गोड प्रकरण—
- **पांच कविता** :—श्रीकांत पुरोहित, मनोहर वऱ्हाडपांडे
- **कलाकृति** :—**कलाकृतीच्या जन्मकथा**—भय्यासाहेब ओंकार
- **सदरें** :— **दीपमाला**—समिधा मधुकर, रसिक मनोहर.

याशिवाय हास्यचित्रें, व्यंगचित्रें, रंगीचित्रें, पानपुरकें वगैरे.

*संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०-४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १। रु. + रजि. पोस्ट ५० न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.


रे. नं. ७७७६९

Garm DALALART







अनुक्रमणिका



## दलाल आर्ट स्टूडियो

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४.

टेलिफोनः ७७७६५  तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणादारांस सूचना :** दीपावळी व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु.१२–५०न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. परदेशी वार्षिक वर्गणी रु. १६–००

● वर्गणी मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टूडियोच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ न. पै. वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● अंक न पोचल्याचें कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● जाहिरातींचा व्यवहार हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येतें. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमीजास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● साहित्याच्या स्वीकृतीचा निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य गहाळ** झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. दीनानाथ दलाल यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.

# हंसतील त्यांचे दांत दिसतील.....

काांहीं दिवसांपूर्वीं आपल्या एका व्याख्यानांत सुप्रसिद्ध टीकाकार व समीक्षक प्रा. वा. ल. कुलकर्णी मराठी वाङ्मयाच्या सद्यःस्थितीबद्दल बोलतांना म्हणाले, कीं 'आजकाल जें कांहीं माझ्या वाचनांत येत आहे, तें अत्यंत घाणेरडं आहे; भयानक आहे!' प्राध्यापकांनीं ते उद्गार अत्यंत तळमळीनें काढले; परंतु आपण घाणेरडें काय वाचलें–विशेषतः कोणत्या नियतकालिकांत वाचलें–हें त्यांनीं तिथें तुडुंब भरलेल्या सभागृहाला सांगितलें असतें तर मात्र मोठी गंमत झाली असती. एखाद्या विशिष्ट नियतकालिकाचें त्यांनीं नांव घेतलें असतें–आणि त्या नियतकालिकाचा खप घेताचाच असता; किंबहुना मुळींच नसता–तर दुसऱ्याच दिवशीं त्या नियतकालिकाचे अंक तिप्पट किंमतीला विकले गेले असते. बाजारांतून ते नाहींसे झाले असते. कदाचित त्यांचा काळाबाजारहि झाला असता.

मध्यंतरी अशाच एका नियतकालिकांतील कथेवर एका मान्यवर संपादकांनी कडाडून हल्ला चढवून सात्विक संताप व्यक्त केला व अशा लिखाणानें समाजाला अनिष्ट वळण लागेल अशी आरोळीहि मारली, पण 'हायरे दैवा!' दुसऱ्याच दिवशीं तें नियतकालिक (ज्याला तांपर्यंत कुणींहि विचारलें नव्हतें) सहापट किंमत देऊन लोक विकत घेऊं लागलें. मासिकांच्या बाजारांत एकच हलकल्लोळ माजला.

मराठी वाङ्मयाची सद्यःस्थिति पाहिली म्हणजे डोळे फाटून जातात. भारतांतील अन्य कोणताहि प्रांत याबाबतींत तरी आपली बरोबरी करूं शकणार नाहीं. भारताच्या उत्तर आणि दक्षिण या दिशा तर रामायण व महाभारतांतच अजून गुंगून आहेत. बाकीच्या ठिकाणीं संस्कृति, संस्कृति आणि संस्कृति या अभिमानापलीकडे कांहीं दिसत नाहीं. परंतु महाराष्ट्रांचें तसें नाहीं. महाराष्ट्राची प्रत्येक विषयांतली प्रगति ही गरुड भरारीसारखी आहे. प्रत्येक विषयांत आम्हीं अत्यंत खोल बुडी मारलेली आहे. लैंगिकतेची आम्हीं जशी वाङ्मयांतून चिरफाड चालविलेली आहे तशी चिरफाड करण्याचें सामर्थ्य अन्य प्रांतीयांत नाहीं. कारण मराठी माणसाला मिळमिळीतपणा आवडत नाहीं. त्याला सारें कांहीं झणझणीत व मसालेदार हवें. झटकेदार हवें. खाण्यापिण्याचीच गोष्ट घ्या ना. परप्रांतीयांनीं इथें येऊन याबाबतींत थोडा का धुडगूस घातलेला आहे. रोज पाहावें तो डोळे दिपवून टाकणारा नखरा व खाद्यपदार्थांचीं नवीं नवीं नावें रुचीपालट म्हणून आपण तिथें जातों, खातों; पण कोंगाड्याच्या मटणाच्या झटक्याची चव त्याला येईल काय? छे!...

कथावाङ्मयाचा आस्वाद घेतांना देखील मराठी माणसाला असाच झटका हवासा वाटतो. नित्य नव्या स्वादाची फोडणी त्याला हवी. ती देणारा लेखक त्याला प्रिय वाटतो. देणाऱ्यानें देत राहावें; तो कुरकुर करीत नाहीं. ती फोडणी मात्र झोंबटी हवी. मराठी कथा दिवसेंदिवस पाचकळ होत चाललेली आहे, लैंगिक विकृतीनें पछाडलेली आहे अशीहि ओरड ऐकूं येते. संस्कृतीचे धडे संतांनीं दिले. शतकानुशतकें अजीर्ण होईपर्यंत दिले. आतां त्यावर कांहीं पाचक नको का? हें पाचक थोडेसें पांचट आणि अधिकसें पाचकळ असलें म्हणून त्या विरुद्ध पांचजन्य करण्यांत काय अर्थ आहे? आमची वृत्तीच मुळीं अतिकुतूहलाची. एकवेळीं अत्युच्चतेची आम्हीं बेफाट चिरफाड केली. आतां पाचकळाची करतों आहोंत. ती करतांना संग, संगति, संगम, संभोग इत्यादींचे संघर्ष दाखविल्याशिवाय कसें चालेल? ज्या सुप्रतिष्ठित लेखकांनीं प्रेमाच्या सोज्वळ सुंदर रूपाच्या चंद्रभागेची–मागच्या पिढीला आंघोळ घातली, तेच लेखक आज नव्या पिढीला चिखलांत बुचकळून काढताहेत; पण त्यांचा तरी दोष आहे का? त्या चंद्रभागेचें पाणीच आटल्यावर त्यांनीं तरी काय करावें? या उलट जेवढा कामवेद अधिक प्रसवूं तेवढी नवी पिढी सशक्त न्






अनुक्रमणिका




स. न. वि. वि.

आपल्या धुरंधर संपादकत्वाखाली निघणाऱ्या 'दीपावली 'चा मी नियमिक वाचक आहे. हें प्रांजळपणें लिहावेसें वाटतें. खरें म्हणजे आपल्या 'दीपावली' मासिकाचा अंक वाचनीय असतो. इलकेच्य भव्हे सर नेवरमंहि

असतो. ह्यांतील लेख, कथा, कविता, व्यंगचित्रें आपापल्या जागीं वैशिष्ट्यांनीं शृंगारित झालेलीं दिसतात. ही संपादकांची स्तुति करतो असें नव्हें, तर एक सत्याचाच मागोवा मी ह्या पत्रांत घेत आहे.

आपल्या प्रत्येक अंकाचें कांहींतरी वैशिष्ट्य असतें.

सौ. शिरीष पै ह्यांची 'खडक चाफा' ही कथा फारच आवडली. तसेंच श्री. श्रीराम कामत यांची 'भीष्माचा डोंगर' ही कादंबरी-सुद्धां नव्या धाटणीची वाटली. अपेक्षा आहे कीं, अशाच प्रकारची कलायुक्त परंपरा 'दीपावली' पुढें पुढें चालू ठेवील.

आपला,

**दिनकर राव**

दादर, मुंबई

स. न. वि. वि.

आपल्या 'दीपावली' मासिकांतून श्री. आनंद साधले यांची 'भारतीय कविकुल–भूषण'ची लेखमाला वाचली. ही लेखमाला अत्यंत विद्वत्तापूर्ण अशा शैलीची असून लेखकानें कलात्मकरीत्या भारतीय संस्कृत कवींची सामान्य माणसाला समजेल अशी संक्षिप्त वर्णनें त्यांत दिलीं आहेत. ज्यानें प्रत्येक संस्कृत कवीविषयीं त्यांचे मोठाले ग्रंथ वाचले नसतील अशांना त्यांच्याविषयीं सामान्य माहिती या लेखमालेंतून अवश्य मिळते.

मी आपले व श्री. साधले यांचें अभिनंदन करतों. असेंच साहित्य 'दीपावली 'तून भविष्यकाळांत वाचायला मिळो.

आपला,

**मनोहर जोशी**

( आर्टस् कॉलेज, बडोदें )

स. न. वि. वि.

आपल्या 'दीपावली 'चा मी नियमित, श्रद्धावान वाचक आहे. महाराष्ट्रांत जीं दर्जेदार मासिकें प्रकाशित होतात त्यांत 'दीपावली' अग्रभागी आहे हें निर्विवाद.

श्री. आत्माराम नीलकंठ यांची महाभारतावरील लेखमाला ही आपल्या मासिकाची अप्रतिम साहित्याची बाब होती.

श्री. आत्माराम नीलकंठांचें मनःपूर्वक अभिनंदन! त्यांचा परिचय आपण यथाकाल करून देणार काय?

ही लेखमाला पुस्तकरूपानें प्रसिद्ध होणार काय? ती व्हावी अशी मनोमन इच्छा आहे.

आनंद!

आपला,

**म. कृ. पारुणीकर**

(जालना)

सचल होईल असें हे मान्यवर लेखक आरोळी मारून सांगतात. आणि तें खरेंहि आहे.

खरें म्हणजे नित्य नव्या कामकथेनें जें आज लोकप्रियतेचें शिखर गाठलेलें आहे ती तशी लोकप्रिय करणाऱ्या लेखकांचे समाजावर एकप्रकारें उपकारच आहेत. कारण अन्य मार्गानें कामतृप्ति ही बरीचशी खर्चिक बाब आहे. आणि मराठी माणूस धनाच्या बाबतींत दरिद्री. तेव्हां निदान अशा सन्मार्गानें व सवंग पद्धतीनें–म्हणजे असल्या गोष्टींच्या वाचनानें–जर मनाला शांति मिळाली तर ती वाईट गोष्ट थोडीच आहे? म्हणे परप्रांतीय लोक आम्हांला याबाबतींत हंसतात! हंसेनात का—हंसतील त्यांचे दांत दिसतील; पण आमचें कांहीं सुद्धां दिसायचें नाहीं, किंवा वांकडे व्हायचें नाहीं. आमची कथा आज समृद्ध आहे. आघाडीवर आहे. पतिदेव, मुलेंबाळें, आईबाप, बहीण-भावंडें असल्या सोज्ज्वळ संसारी व्यापाराच्या व मिळमिळीत प्रेमाच्या क्षितिजापासून ती दूर दूर गेलेली आहे. वरचें वस्त्र फाडून टाकून तिनें अंतर्भागांत प्रवेश केलेला आहे. आजच्या एका कथेंतली पत्नी आपल्याच नवऱ्याला सांगते "तुम्हीं वेष बदलून परपुरुष होऊन या आणि माझ्यावर बलात्कार करा ना गडे!'

वाहवा! किती उदात्त कल्पना! किती दिव्य विचार! अशा तऱ्हेची कथा लिहिणाऱ्या लेखकाच्या प्रतिभाशक्तीनें गरुड भरारी मारली नाहीं असें कोण म्हणेल? म्हणे उत्तर सीमेवर रणकुंड पेटलेले आहे. पेटूं दे! आमचें कामकुंड नुकतेंच कुठें पेटलेलें आहे. फार मोठा हवि शिल्लक आहे. तें हवन एकदां पुरें होऊं दे तें पुरें होऊन नवी पिढी सुदृढ व सशक्त होईल मग पाहूं कोण पुढें येतो तो!

दीपावलीचा हा खास कथा विशेषांक वाचकांच्या हातीं देतांना वरील विचारांनीं एक प्रकारचें समाधान वाटत आहे. यांतील कथा वाचून रसिक वाचकहि समाधान व्यक्त करतील आणि संपादकांच्या कष्टांचें चीज करतील अशी आशा आहे. . . १००









अनुक्रमणिका



**वाऱ्याचा** वेग खूपच आहे. सारखा सूं ऽ ऽ ऽ सूं ऽ ऽ ऽ आवाज येतो आहे. दाराच्या दोन्हीं बाजू जोरजोरानें मागें पुढें होत आहेत. खिडक्यांच्या पडद्यांची फडफड सारखीं सुरूं झालेली आहे. ढगांचा गडगडाट सारखा चालूच आहे. आवाज कधीं कमी होतो, कधीं जास्त.

खोलींत अस्वस्थपणें येरझाऱ्या घालणारा सुनील दाराजवळ येतो. दाराच्या दोन्ही बाजू होलपटल्यासारख्या मागेंपुढें होतात...त्या पिसाटपणाकडे तो एक टक पाहतो. दारांतून पावसाचा शिपकारा तोंडावर मारला जातो. सुनीलला शहारल्यासारखं होतं. तो पुढें सरकतो आणि दाराच्या दोन्हीं बाजू हातानें गच्च पकडून ठेवतो. (तेवढंच त्याच्या हातीं असतं!) तो थोडावेळ बाहेर पहातो आणि त्याच्या मनांत एक वेडसर कल्पना येते. कुणाच्या तरी मुस्काटांत फाडकन् मारल्यासारखा तो दरवाजा धाडकन् बंद करतो आणि निश्चयानं 'बोल्ट' पक्का बसवून टाकतो. तेवढ्याचीच त्याला धाप लागते वादळवाऱ्याचा आवाज दार बंद केल्यामुळें कमी वाटतो. परंतु दूरवर असलेल्या समुद्राची गर्जना त्याला ऐकूं येतेच. डोंगराएवढ्या लाटा मोठमोठ्या खडकांवर धडाधड कोसळून फुटत असल्याचें दृष्य तो बंद दारांतूनच बघतो. तो पुन्हां येरझारा घालतो. खिडक्यांवरील पडद्यांची सळसळ सुरूच असते. पडदे अडकावून ठेवले नसतेत् तर कदाचित् ते कागदी पतंगासारखें कुठल्याकुठे उडूनहि गेले असते, असं त्याला वाटतं. आणि मग असंहि वाटतं कीं जर खिडकी आपण लवकर बंद केली नाहीं तर हे पडदे खिडकी घेऊनहि कदाचित् उडून जातील. तो खिडकी जवळ जातो आणि फाडकन् ती बंद करतो. बंद केल्यावर शिवी दिल्यासारखा त्या खिडकीकडे बघतो. रडून रडून आकांत करून झोपलेल्या मुलासारखा तो पडदा नुसतांच लोंबकळतो. परंतु थोडीशी हालचालही करतो. दुसऱ्या खिडकींतून येणाऱ्या वाऱ्यामुळें सुनील दुसरीहि खिडकी बंद करतो आणि नंतर त्याला खूप समाधान वाटतं. ती आल्यासारखं. आराम खुर्चींत तो ताणून बसतो. दोन्हीं हातांचीं बोटें एकमेकांत गुंतवितो. मग गुंतवळ सोडवून खिसे चाचपडतो. सिगारेट केस काढून त्यांतली एक सिगारेट ओठांत अलगद्शीं ठेवतो. लाईटरनें शिलगावितो. सिगारेट शिलगावितांना लाइटरच्या ज्योतीची प्रत्येक दमासरशी कमी होणारी लय पाहून त्याला मजा वाटते. लाईटर विझवून तो सिगारेटचे झुरके मारूं लागतो. खूप खोलवर. मग धुराची दोन हाताची पुंगळी सोडतो. डोळे किलकिले करून.म ा त्याचे डोळे मोठे होतात... वटारल्यासारखें कुणाच्या तरी हंसण्याचा आवाज त्याच्या कानांवर येतो. कुणाच्या कसला? तो

अनुक्रमणिका





*आहे त्यापेक्षां जरा वेगळें जीवन जगण्याचीं धडपड केव्हांही चांगली. पण जीवनाला कांहीं समाजाचीं, संस्कृतीचीं आणि नीतिचीं बंधनें हवींतच. प्रेम आणि नीतीच्या बंधनांत आवृत्त झालेल्या श्री.* **मनोहर तल्हार** *यांच्या या कथेचीं रचना आणि आकार आपणांस नव्या धाटणींचा वाटेल.*

परिचित आवाज निश्चितच कमलचाच असतो.

त्या आवाजानं त्याला हंसायलाच येतं. तो तोंडांतल्या तोंडांत पुटपुटतो—

' किती विचित्र छोकरी आहे ही ! '

खरंच ती विचित्र असते. तिच्या वागण्याचं तंत्र अगदीं तिचंच आहे. कुणाच्या शब्दांना कांहीं किंमत ? निदान सुनीलच्या तरी ? मुळींच नाहीं. तिनंच त्याला पांचला वाट बघायला सांगितलं. अगदीं निक्षून. तीनतीनदां बजावून; मी आल्याशिवाय तूं कुठेंहि जायचं नाहीं. आतां सहा वाजताहेत. पाऊस आतांच सुरू झाला आहे. पांचला यायला खरं म्हणजे कांहींच अडचण नव्हती. पण ती आली नाहीं. तिनंच त्याला बजावून सांगितलं होतं, तरी ! त्यावर तो म्हणालाहि होता, ' बघ बरं कम्मू, तूंच येणार नाहींस सांगूनहि ! ' त्यावर ती म्हणाली, ' यावेळीं असं कधीं होणार नाहीं सुनील. माझ्या सुन्नू, असं कधीं होणार नाहीं आतां. कदाचित् तूंच माझ्याकरितां थांबणार नसण्याचा संभव आहे.'

...आणि सुनील साडेसहा वाजलेंत तरी ताटकळत आहे. तिच्याकरितां. म्हणे आपण पिक्चरला जाऊं...' प्रिन्स ॲण्ड द् शो गर्ल !' ' आता हिला कोणता खेळ मिळणार आहे ? कीं ही गल्लीवरल्या ' प्रिन्स ' विषयीं म्हणाली होती कीं गारुड्याच्या खेळासंबंधीं बडबडली होती ? कांही कळत नाहीं. बाकी ती जादूचा परिणाम झाल्यासारखी कुठेंहि गुंगणारी खास आहे. परंतु अशा बेजबाबदार छोकरीची आपण वाट पाहणारे प्रिन्स...शतमूर्ख. परंतु मूर्खपणा पटूनहि आपण तिची वाट पाहतो...ही मूर्खपणाची कमाल! कमलनं असं कां वागावं ? तिची अलिकडची ही वागणूक अशी कां ? कुणाची सुद्धां ती भीड ठेवीत नाहीं. कुणाची भीति बाळगीत नाहीं. अगदीं आपली सुद्धां ! चांगली शिकलेली. परंतु म्हणूनच शेफारलेली कां ?'

खूप जोरजोरानें दार ठोठावलें जातें. नंतर लाडिक आवाजांत हांक ऐकूं येते—

' सुन्नू, ये लाडक्या सुन्नूऽऽऽऽऽ'

आवाज ऐकूं येऊनहि सुनील खुर्चींतून उठत नाहीं. सिगारेटचे मजेशीर झुरके मारतो. पुन्हां आवाज येतो.

' सुन्नू ऽऽऽऽ '

सुनील खुर्चींत तसाच पडून असतो. मग चिडलेला आवाज ऐकूं येतो.

' अरे ये सुन्याऽऽऽ, दार उघडतोस किनई ? तुझी मावशी तुला हांक मारते आहे ! '

तो उठतो. चिडूनच. पण नंतर हंसण्याचा आविर्भाव चेहराभर पसरवितो. राग गिळून. सिगारेट बुटाखालीं ठेचतो. दार उघडतो— आणि उघडलेल्या दारांत ती उभी दिसते. तो तिचं उपरोधिक स्वरांत स्वागत करतो—

' बा अदब, बा मुलाहीजा, बेगम–ए–सुनील; मालुके कातिल; वफादार कमल पधार रही हैं ऽऽऽऽऽ'

ती तशीच दारांत उभी असते. छद्मीपणानं हंसत तो त्याच सुरांत पुन्हां म्हणतो—

' आइ ये सरकार, क्या लावूं ? चाय् शर्बत ? '

आणि नोकरांना बोलावण्याच्या पद्धतीची टाळी वाजवून म्हणतो—

' रहेमान ऽऽऽऽऽ'

कमल एकदम खूष होऊन अंगअंग मोडरून गेल्यागत हसते. हंसणें आवरून म्हणते—

' अजी रहने दिजिये. इसकी क्या जरूरत हैं ? ' आणि मग किंचित् थांबून म्हणते— हलक्या आवाजांत—

' आपके होनेके बाद ? '

सुनीलला मनापासून बरं वाटतं. तो एकदम खूष होतो. खिलाडीपणानं म्हणतो—

' वाह् वाह्, क्या कहने हैं ? क्या राहते हैं ? क्या पहेने हैं ? '

कमल मधासारखीच पुन्हां एकदां हसते.

सुनील मग तिच्याकडे रोखून पाहतो. गालांतल्या गालांत हसतो म्हणतो—



' तुमच्याशीच लग्न व्हावं, हेंच वरदान हवंय !'

'भाई, आजके लिबास का तो कोई जवाब नहीं. सुभान अल्लाह!'

'हाय अल्लाह, तुम्हे यह क्या होगया मेरे हुस्न के दिवाने?'

'तुझं नाक?'

'छान. मला वाटलं की तूं मोंगल इतिहासाचा अभ्यास करीत आहेस म्हणून!'

'तो केव्हांच संपला. आतां ज्योतिष विद्येचा मी अभ्यास करणार आहे!'

'तो कशासाठीं?'

'कमलसाठी!'

'म्हणजे मला नाहीं कळलं बाई यांतलं कांही?' ती भोळेभाबडेपणानं हंसून विचारते. तो वेडावून उत्तरतो–

'तुला कसं कळणार? जिथें तूं काय बोललीस हें तुझं तुलाच कळतं नाहीं, तिथं माझं म्हणणं तुला कसं कळेल?'

ती हंसते, मनमोकळेपणानं म्हणते–

'कळलं, कळलं बरं कां शास्त्रीबुवा, मी दिलेल्या वळेवर आलेयें नाहीं म्हणून चाललं आहे तुमचं पुराण. कळलं बरं!'

'कळलं?'

'हो हो हो!'

'फार छान झालं.' नंतर थोडा थांबून तो पुन्हां म्हणतो-

'म्हणजे फार छान झालं. आतां ज्योतिष शास्त्राचा अभ्यास रद्द!'

'तो का?'

'यापुढें आतां तूं अगदीं–' किंचित हंसून पुढें म्हणतो–'यातला अगदीं हा शब्द नक्की या अर्थानं नाहीं घ्यायचा हं–वेळेवर येत जाशील.' नंतर तो कमलच्या आवाजाची नक्कल करून म्हणतो–

'सन्नू, उद्या आपण पिक्चरला जाऊं रे. मला किनई ऑर्डी क्लबॉर्चो थोडॉर्श कौटाळॉचच ऑला बाई. मग उद्याला तूं पॉंचॅलॉ थॉंबशिल नॉ रे मॉझ्या रॉज्या?'

ती त्याच्याकडे एकटक पाहते. हंसून. मग तो तिरसटपणें म्हणतो–

'थांबेन. अवश्य थांबेन. माझ्या शरीरांतल्या हृदया–हृदय थांबल्यावरहि थांबत जाईन.' आणि मग तो चिडून विचारतो–

'ही काय यण्याची वेळ आहे? तुला उशीरानं यायचंच होतं तर मला तसं सांगायचं असतं!'

ती पुन्हां पुन्हां मोकळेपणानं हंसते तशी आताहि हंसते. मग नेष्टेखोरपणानं म्हणते–

'तुला खूप वेळ थांबवं लागलं कां रे, डार्लिंग?'

'नाहीं ग. पण तुलाच माझ्याकरितां फार मोठ्या कामांतून वेळ काढून इथं यावं लागलं. Excuse हं!'

'हो नं. खरं म्हणजे फार मोठं काम होतं. पण केवळ तुझ्याचसाठीं सवड काढली मी प्राणनाथा!'

'चुलींत घाल तुझ्या प्राणनाथाला. माझी किंमतच किती आहे? आहे बिचारा प्रेमाचा भिकारी 'प्रीतीचा भिकारी आला तुझ्या दर्शनाला। घेऊनी अश्रूंच्या माला' तुझ्या प्रेमाची भीक घेण्यासाठीं बसला आहे तो. आणि तुम्ही दर्शन देणाऱ्या देवता? कुठें होतीस तूं आतांपर्यंत?'

'कुठेंहि! किनाऱ्या आवाजांत तिचें उत्तर!

'दिलीपनं चहाला थांबविलं होतं वाटतं?'

'अं हं. चुकलास. बरोबर ओळख पाहूं?'

'मग हृषिकेशनं गायला लावलं असेल?'

'अं हं!'

'शर्मांला पियानो ऐकवला असशील?'

'अं हं. चुकलास. सपशेल चुकलास. आतां पुन्हा ओळख पाहूं!'

'मिस्टर डिसूझाबरोबर नृत्याला गेली असशील? त्याला बॉल डान्स आवडतो ना, म्हणुन म्हणतो!'

'सपशेल चुकलास!'

'मग नरेंद्राने स्विमिंगला नेलं असेल!'

'नाहीं नाहीं नाहीं. यांतलं कांहीं खरं नाहीं.' नंतर ती थांबून त्याच्याकडे एकटक पाहते. विचारते–

'माझ्यांत कांहीं बदल झालेला आढळतो कां?'

तो तिला न्याहाळून पाहतो. म्हणतो–

'अच्छा अच्छा. तर तुम्हीं हा धर्म स्वीकारला म्हणायचा तर?'

'छे छे. तसं वागायला तो धर्मंचं स्वीकारला पाहिजे असं थोडंच आहे?'

'बरोबर आहे. तसं वागायला तो धर्मच स्वीकारला पाहिजे असं नाहींच. धर्म स्वीकारल्यानंतर धर्मातलीं मतं पाळणं देखील कुठं आवश्यक असतं? बहुतेक पाळल्याच जात नसतात म्हणा, तसंच धर्म न स्वीकारताही एखाद्या धर्माप्रमाणें वागणं मुळींच वावगं नसतं. छे छे मुळींच नाहीं.'

'हो ना, तेंच मीहि म्हणते. ते बीणाचे काका, सदाशिवराव सरनाईक, किती कर्मठ? पण त्यांना म्हणे आतांशा सगळं कांहीं चालतं!'

'सगळं कांहीं म्हणजे?' तो विचारतो. ती हंसते. उलट विचारते—

'सगळं कांहीं म्हणजे?'

तो तिच्याकडे पाहतो. दारांची उघडझांप पुन्हां सुरू होते. पाऊस थांबलेला असतो केव्हांच. ती आली, तेव्हांहि पाऊस नव्हता. पण कमल जराहि ओली झालेली नसते. गाडींत आली असावी. परंतु गाडी तर तिच्या पपानं कालच नेली कलकत्त्याला. शरच्चंद्र रॉयच्या फियाटमधूनही आली असेल. निश्चितच. त्याच्या कानावर एकेका अक्षरांचा उच्चार आदळतो.

'स–ग–ळं– कां–हीं म्ह–ण–जे स–ग–ळं कां–हीं. मा-से दारू बाई इत्यादि इत्यादि. थोडक्यांत जे लोक इतर–अंहं–तसं नाहीं कळायचं तुला!' नंतर ती भूगोल पाठ करावा तशी लहानमुलासारखीं हेल काढून म्हणते—

'जे लोक इतर लोकांना ज्ञान शिकवितात–उपदेश करतात तेंच लोक नेमकें त्याच्या विरुद्ध वागतात.'

'निदान एखादं उदाहरण?' सुनील विचारतो.

'एकच कां? अनेक उदाहरणें देतां येतील. आतां फक्त एकच उदाहरण देते. एखादा कीर्तनकार चोखोबासाठीं पांडुरंग महार झाला होता–तो त्याच्याबरोबर जेवला होता आणि त्याच्यासाठीं ढोरं देखील ओढली होती म्हणून आळवून आळवून सांगेल. परंतु त्याच्या घरीं एखादा खराखुरा महार गेला तर तोच कीर्तनकार त्याला कुणाकरवी धक्के मारून घालवून देईल. खरं ना हे?'

'आहे खरं! आणि म्हणून वाटतं कीं तूं हिंदुधर्मांतली असूनहि अशी खिश्चनासारखी वागत्येस त्याचं कारण असं उलट असण्यांतच असावं!'

'त्याचं कारण हेंच नाहीं. कदाचित् दुसरंहि असूं शकेल. तशी वागते म्हणून मी हिंदु धर्माला मानीत नाहीं असं समजणं थोडं खुळेपणाचं होईल.

'आजकाल किती खुळं निघालींत म्हणून सांगूं? कोणत्याहि धर्मानं परधर्मसहिष्णु असावं हें जर खरं मानलं तर तुझ्यासारख्या हिंदुधर्मांतल्या तरुणीनं दुसऱ्या धर्मांतला नुसता पोशाख, आपली राहाणी तशी ठेवण्याची सहिष्णुता दाखविली तर त्याला मात्र मी खूळ म्हणणार

अनुक्रमणिका






नाहीं. परंतु हें खूळ इतकं माजलं कीं विचारतां सोय नाहीं. तसें नसतें तर पाश्चात्याच्या प्रत्येक बारीक सारीक तपशिलांचें अनुकरण झालें नसतें. बाकी कन्नू, तूं या पोशाखांत छान दिसतेस हं! आणि तूं आल्याबरोबर तूं उशिरा येण्याचं कारण कळलं मला. तुला केंस बॉब करायला वेळ लागला हें खरं ना?'

'Yes My Lord! अगदीं खरं!' दरवाज्यांतून आलेल्या वाऱ्याच्या झोतानें तिचे आंखूड केंस भुरूभुरू उडूं लागतात. ती ते मोठ्या नाजूकपणानं सांवरते. एखाद्या न्यायाधिशानं विचारल्याप्रमाणें ती उत्तरीत असल्याचं बघून तो त्याच पद्धतीनं विचारतो—

'आपलं एकमेकांवर प्रेम बसण्यापूर्वी कधीं बॉब केल्याचं तुम्हांला आठवतं काय?

'हो आठवतं. रोमन हॉलिडे पाहिल्यावर चिंचहोपचा मी एक चित्रपट बघितला आणि नंतर—'

'न्यायालयांत पाचकळ विनोद नको. मी विचारतो त्या प्रश्नाचं तेवढं उत्तर द्या!'

'हो आठवतं!'

तुम्हीं बॉब कराल याची मला होप होतीच म्हणा!'

'न्यायालयानंहि पाचकळ विनोद करूं नये अशी मी न्यायालयाला प्रार्थना करते!'

प्रार्थना देवाची करा. बाकी तुम्हीं या आखूड केसामुळें दिसतां छान!'

'न्यायालयाच्या कक्षेंत प्रस्तुत शेरे अप्रस्तुत होत!

'मान्य आहे. परंतु न्यायालयाला जें वाटलें तें न्यायालयानें बोलून दाखविलें. त्याबद्दल आरोपीनें आम्हांला क्षमा करावी!'

—आणि नंतर दोघंहि मनमोकळेपणानं हंसतात.

बाहेरचा ओलेपणा पुन्हां एकदां जाणवतो. आकाश पूर्ण दाटून आल्यानं सर्वत्र काळोख भरून जातो. बर्फाच्या किसासारखा बाहेर पाऊस पडूं लागतो. वारा एकदम थांबलेला असतो. ढगांचा गडगडाट आणि त्यानंतर लख्खन् चमकणाऱ्या विजा आळीपाळीनं पाठलाग करतात एकमेकांचा.

लख्खन् वीज चमकते. खोलींत प्रकाश असूनहि खोली क्षणभर उजळून जाते. नंतर गडगडाट. नगाऱ्यावर दाणकन् सोटा आदळल्यागत.

ढगांच्या गडगडाटासारखें हंसणें विरते. हळूंहळूं सुनील तिच्याकडे एकटक पाहूं लागतो. ती दुसऱ्या एका खुर्चीत आरामांत बसून 'लाईफ' चाळूं लागलेली असते. मग तो रुष्ट स्वरांत विचारतो—

'तूं असला मूर्खपणा कां केलास?'

'केलं तें जगावेगळं आहे काय?' कमलचा स्वर बदललेला असतो.

'जगावेगळं? छे छे. जगावेगळं कसं असणार? जगांत कुठें ना कुठें ही फॅशन आहेच. म्हणूनच तें करणं जगावेगळं नाहीं!' त्याचा स्वर ती ओळखते. म्हणते—

'माझं मत म्हणून मी मांडते. अमक्यानं अमूकच करावं आणि अमूकच करूं नये अशा कर्मठ विचारसरणींचे कितीतरी लोक आढळतील. परंतु त्यापैकीं तूं एक असावास म्हणून मला आश्चर्य वाटतं. तुझ्यासारख्या पुरोगामी विचारसरणीच्या माणसाला हे पौराणिक विचार पटावेत, ही खरोखर आश्चर्याची गोष्ट आहे!'

तो निश्चयानं म्हणतो—

'नवल आहे खरं. परंतु त्याला नाईलाज आहे. तुझ्या दृष्टीनं मी कदाचित् नालायक माणूस असूं शकेन, परंतु त्याही गोष्टीला माझा

...पान ४८ वर

—श्रीराम कामत

# ५

**मुंबईची** मेहता, करीमभाई आणि कंपनी वर डोंगरांत मँगनीजच्या खाणी सुरू करणार ही बातमी गांवांत झाली आणि वावटळीसारखी उडाली.

म्हणजे गांवांत दुसरी बातम्च नव्हती.

त्यांचंही बरोबर म्हणा ! डोंगरामध्यें वाळून उतारावर चारी बाजूं गांव वसलेलं. कुठूनही बघितलं तरी लक्ष जाई प्रथम या डोंगराकडे. तर दुसरा विषय तोंडून निघेलच कसा ? कांहीं उपयोगाचा नाहीं म्हणून इतके दिवस लोकं त्याला नुसत्याच शिव्या देत. पण तींच आतां म्हणूं लागलीं–' या राज्यांत कशाचीच शाश्वती उरली नाहीं बाबांनो ! सगळं सगळं झालं ! आणि तर्शी आमच्या या भीष्मावर गदा आलेली दिसते–काय ? '

लोकं म्हणत चेष्टेनं, हंसत हंसत. पण या बोलण्यामागें गैरविश्वासाचा आणि कांहींसा संशयाचा जो सूर होता तो मात्र खोटा नव्हता. मुळांत या बातमीवरच तसा कोणाचा विश्वास नव्हता. गांवांत राहून चारचौघां-सारखं वागायचं म्हटलं कीं चटकन् असा कशावरही विश्वास टाकून भागत नाहीं. हातचं राखून बोलावं लागतं, तोल सावरून चालावं लागतं. नाहींतर मुळीं चालायचंच नाहीं ! शब्दाला किंमत ठरणार नाहीं, माणसाला पत रहाणार नाहीं. व्यवहारांत विश्वास ही एक अशी बाब आहे कीं जीव गेला तरी ती दुसऱ्यावर टाकतां येत नाहीं ! वय वाढत जातं तसं अनुभावानं हें ज्ञान आपोआप ज्याचं त्याला येतं. आणि एकदां तें आलं कीं मग बिचारा स्वतःलाच परका होतो, पारखा होतो.

अनुक्रमणिका






गंमत म्हणजे डोंगरावर मॅंगनीजच्या खाणी कांहीं प्रथमच सुरू होणार नव्हत्या तर गांवांत लोकांनीं अविश्वास दाखवावा ! असे प्रयत्न यापूर्वी एक दोनदां झाले होते. अशींच कांहींबाही जबरदस्त नांवं सांगत गाजवजत आलेल्या कंपन्या चारसहा महिन्यांत दिवाळं वाजवून गेलेल्या लोकांनीं पाहिल्या होत्या. त्यांनीं तिकडे डोंगरावर रचून ठेवलेले मॅंगनी-जच्या दगडांचे ढीग आजसुद्धां तसेंच पडून होते. तो माल मुळीं उटलाच नव्हता. गिऱ्हाईकच मिळेना. काय व्यवहार झाला. तो आंतबट्ट्याचा. बुडालीं 'कंपणी, कंपणी' करीत खाणींत वावरणारीं लोकं. त्यांचे थकलेले पगार अद्याप मिळायचेच होते. आतां गांवचीं लोकं बाकी कशीही असलीं तरी मोफत श्रम करण्याची आदत एकालाही नव्हती. त्यापेक्षां अंगावर पांघरूण ओढून खोपटांत स्वस्थ पडून रहातील. तेंच बरं, निदान वेळ तरी सत्कारणीं लागतो अशी त्यांची भावना !

बातमी बरीवाईट कांहींका असेना, काथ्याकूट करून तिचा साफ भुसा पडेपर्यंत गांवात लोकं स्वस्थ बसणार नव्हतीं. हातचं काम उद्यांवर टाकतील, पण आज या असल्याच चकाट्या पिटत बसतील. आणि त्यांतही धोरण ठेवतील. गांवांतील बड्या धेंडांच्या मिजाशी संभाळतील, जमल्यास खाजगी उखाळ्यापाखाळ्या काढून घेतील, मुद्याचं हराम बोलणार नाहींत. तें काय तें आपल्यापाशीं ठेवून, भाताचं पाखड झाडावं तसं वरवर चऱ्हाट लावून रहातील. बाळ्या तेल्याचा घाणा, विश्रामाची सुतारशाळा, बापला नाईकाचं दुकान, बस्त्यांव खिस्तांवाचं खळं, रावल्या कृष्णाचें 'चहाचें' शाप, म्हटलं तर महामायेचं देऊळ-सुद्धां– गांवांत असं एकही सार्वजनिक ठिकाण उरलं नव्हतं जिथं हें 'कंपनी'चं आख्यान चालूं नाहीं.

ही अशी सुरुवात करीत.

'हात् याची ! नाटकाची कंपनी असेल ! मग होईना कां सुरू आपला नाहीं बा विरोध आणि मी विचारतों जी गोष्ट गांवाला पसंत तिला विरोध करणारा मी कोण ? आं !'

आतां या अशा बोलण्यानं हंसूं येणारच ! लोकं फिदी फिदी हंसत सुटत.

आणि एखादा त्यांतच पुस्ती जोडी, 'नाटकच ! पण तिकीट लागत नाहीं. स्टेजा, पडदे या भानगडीच नाहींत. तो डोंगर दिसतो ना, बस्स, कंपनीची तीच स्टेज. सुरुंग उडून भगदाडं पडूं लागलीं कीं आयता एक एक पडदा बदलत राहीलच. काय ?'

'हात मारीच्या, अचूक मनचं बोललास रे !' दुसरा एकजण उत्साहानं ओरडला. 'कंपनीकडे पार्टी मात्र जब्बर, मुंग्यांसारखी रीघ ! काय ? कोणी ठक् ठय् ठय् ठक् करीत खडी फोडताहेत, कोणी घमेलीं उचलून माथ्यावर वाहाताहेत. नुसतीच हुकूमत करीत विडी ओढणारे सुद्धां कमी नाहींत. तर काय ? हें असलं नाटक, आणि फुकटांत !'

'म्हणजे मायचे परतून खाणी सुरू करताहेत का काय ?' कशाचा काहीं पत्ता नाहीं अशा थाटांत त्या इसमानं शंका घ्यावी. चेहऱ्यावर काळजी : दाखवावी. उगाच कानशिलं खाजवीत विचार केल्यासारखं करावं. आपल्याशींच पुटपुटावं, 'तर ती खाणवाली कंपनी येणार होय ? मला वाटलं आपली नाटकाची का काय ?

'कां रे ? जाणार आहेस ?' लोकांनीं खडा मारावा.

'कुठं ?

'कामाला ? तिकडे, वर खाणींत.

तसं त्यानं खूप नाटक करावं. पहिल्या दोन थोबाडींत मारून घ्याव्या. हात उडवीत अंगावर यावं. मान झटकत ओरडावं, 'उपास-

जरी रोजच्या गांठीभेटी होत असल्या तरी लोकं एकाद्याला मुद्दाम साद घालून बोलावीत. विचारत, 'बऱ्याच दिवसांत दिसला नाहींस रे !'

आणि तोही भेरकी असा खुशाल म्हणे, 'टायम नाहीं झाला. जरा कामांत होतो.'

'तीं बेकार कामं राहूं देत आतां !' कुणीतरी सांगावं.

'म्हणजे गा ?'

'अरे कंपनी सुरूं होणार ! आहेस कुठं ? या गांवांत का कसं ?' बरींच माणसं कावकाव करीत उठत.

'कंपनी ?' आयुष्यांत हा शब्द पहिल्यानंच ऐकतों आहे असा त्यानं चेहरा करावा.

'कंपनी म्हणजे कंपनी. ती सुरू होणार म्हणजे काय एकदम वाटेला लागलीच आहे.' हा असा खुलासा केला जाई.

पोटीं ओसरीवर मुडदा होऊन पडेन. पण परतून कोणाची मोफत हमाली करणार नाहीं–कंपनी येऊं दे नाहींतर सरकार..'

आणि कंठाला हात लावून त्यानं शपथ घ्यावी.

'अरे दिवसाला दोन रुपये मजुरी !'

'दहासुद्धां कबूल करतील हो ! आणि हातांत देतील हें—'

आणि हें म्हणजे काय तें तोंडानं न सांगतां, प्रत्यक्ष कृतीनंच त्यानं दाखवावं.

तसा एकच हंशा पिके.

असं कांहींतरी होणार याची लोकांना बहुतेक अटकळ असेच. कंपनीवर तसा सगळ्यांचाच राग होता. फक्त, तो व्यक्त करण्याची एकेकाची पद्धत तेव्हढी वेगळी आणि लोकांना काय त्यांतच गंमत.

'अरे ही कंपनी दुसरी.' मागून तिसराच आवाज उठे.

'पहिली असेल, नाहींतर दुसरी ! पण कंपनीच का नाहीं ? रांडांची जात ती. दिसेल त्याचा धरील हात, जड झालं कीं मारील

लाथ ! थुंकतो.मी, काय ? हा असा–' त्या इसमानं त्वेषानं म्हणावं. आणि खरंच ' खाक थूः ' करीत पचकन् थुंकावं......

आतां यांत खरं काय आणि नाटक किती हें सांगणं कठीण काम होतं. या अशा बोलण्यावरून तरी कोणाच्या मनाचा थांग लागत नसे. फारतर इतकंच सांगतां येईल कीं गांवांत लोकांनीं ' कंपनी ' या शब्दाचा धसका घेतला होता. कंपनीनं आपल्याला बुडवलं, अन्याय केला ही जाणीव मरेस्तोंवर आतां त्यांच्यांत कायम रहाणार होती. आणि कंपनी म्हणजे कंपनी ! त्यांत ही आणि ती, असा नांवाचा भेद करणं त्यांना टाऊक नव्हतं. मागचं पान पुढं चालू असं हिशोबी आयुष्य जगणारीं सामान्य माणसं तीं.

जावं तिथं ही एकच हाकाटी. अण्णागुरुजी झाला म्हणून किती ऐकून घेणार ? त्याचा फडफडाट होई. पण करतो काय ? उभ्या गावापुढं त्याचा निभाव नव्हता. म्हाताऱ्याचा आवाज बाकी पल्लेदार होता. आणि चवताळला कीं त्याला समोरचं देखील धड दिसत नसे.

तेव्हां हें असलं कांहींबाही कानीं आलं कीं काठी उगारून अण्णागुरुजी पुढं सरसावलाच. जसा त्याचाच अपमान झाला होता, कुणी शिवीगाळ केली होती असा उसळे. खडसावून लोकांना विचारी, ' भांचोद ! कोण रे तो ?'

या वेडपटाबरोबर लागायला लोकं वेडीं नव्हतीं. तीं चिपचाप होत. जाब करीत नसत.

पण तशं गुरुजींचं पित्त आणखी खवळे. तो ओरडे, 'कुत्रीं कायरे तुम्ही ? तर हाडकं चघळतां.'

' तूं जा आपला वाटेनं अण्णा.' जाणतेपणानं कुणीतरी सांगावं.

आणि मग अण्णागुरुजीला नको ती चावी मिळे. गळ्यांतील रुद्राक्षाची माळ चाळवीत डोळे मिटून म्हातारा प्रभु रामचंद्राचा धांवा करी. तोंड बोकडासारखं वेडंवाकडं हलवीत राही. भिवया नव्हत्याच. गाल थलथलीत. तेव्हढी पाढरी दाढी मात्र उठून दिसे. कोंब्याचा तुरा माथ्यावर, याचा हनुवटीला. कांहींवेळ अण्णागुरुजीनं असाच नखरा करावा. आणि मग खास आवाजांत म्हणावं, अंतःकरण उघडं करावं, ' जायला सागतां मला ? एकटा ? अरे, आयुष्य गेलं इथं, असं, तुमच्या संगतींत. आतां ह्या वयात एकटा कुठं जाऊं रे ? आणि कसं न् काय, तें तरी सांगा ?'

अण्णाचा स्वर एव्हाना मेणासारखा वितळलेला असे. शब्दच फुटत नसे. नुसती ओठांची हालचाल. आतां याचा अर्थ कोणी कसाही लावावा !

' अण्णा, रडायचं काय काम हो ?' कांहीं लोकं कासावीस होऊन म्हणत.

' उद्यां तुम्ही रडणार ? होय ! आणि म्हणून हिथं काळीज तुटतंय रे !' अवघडून म्हातारा जाब करी. ' मायच्यानों, निदान स्वतःचं हित तरी बघा. काय ? आतां तुम्हाला तें दिसत नाहीं, तर विचारा ह्या अण्णागुरुजीला ! तो एकच माणूस तुमचा. बाकी सगळे चोर–होय, सत्य ! हीं बामणं कण्या टाकून कोंबडी झुंजवतील आणि साधतील काय ? आपलं हित. मराल तुम्ही. काय ? तुमच्या जिवावर माजतील हे. अरे, या अण्णागुरुजीनं सगळा–सगळा अनुभव घेतला आहे रे बाबांनो ! आणि तोच सांगतों. मी म्हणतों ह्याचा तरी फ़ायदा करून घ्या ! आं !'

पण लोकांना शंकाच फार. नाहीं म्हणजे नसती खोडच होती ती. तीं विचारीत, ' अरे अण्णा, तुझा दाजी नाबर बामणच–'

' दाजीचं नांव काढूं नका !' अण्णागुरुजी उसळून म्हणे.' त्याचा यांत संबंध नाहीं.'

आं ! आतां हंसावं कीं रडावं ? नाहीं म्हणजे तुम्हीच सांगा. माथ्याला चेपें, आणि पायांत वहाणा घालून घरोघर प्रचार करीत सुटला आहे दाजी, काय ? सांगतो, कंपनीला थारा देऊं नका, गांवाच वाटोळं करूं नका !

दाजीच्या, कौतुकानं भारावून अण्णागुरुजी मान डोलवायचा, " सांगेल, सांगेल तो ! एकदां टाळक्यांत घेतलं कीं सारखं तेंच. स्वस्थ म्हणून बसणार नाहीं ! "

' जर हें असं आहे तर लोकं कशी स्वस्थ बसतील ? आं ! म्हणजे कांहीं नाहीं बोलणारच तीं. " लोकांनी हंसून म्हणावं, ' आणि तुम्ही म्हणतां दाजी नाबराचा संबंध नाहीं. '

अण्णागुरुजी गप्प बरा बसेल. तो उलटून विचारी, ' पण भड-व्यानूं, दाजी काय बोलतो तें कळून घ्यायची अक्कल आहे रे तुम्हांला ? '

' नाहीं बा ! ' लोकं चटकन कबूल होत, ' दाजी नाबराचं बोलणं कुठं कोणाला कळायला ? उभ्या जल्मांत नाहीं समजलं, तें आज समजणार होय ? तो बोलतो, तावातावानं आपला सांगत रहातो. आम्ही निमूट ऐकून घेतों. त्यालाही बरं वाटतं. आपलं सुद्धां नुकसान नाहीं. '

' गाढव आहांत. ' अण्णानं मत द्यावं.

' म्हणजे गाढव आम्हीच होय ? ' लोकांनीं प्रश्न करावा.

' होय ! शंभर नंबरी गाढव. तसं नसतं तर गाढवीच्यांनो तुम्हांला समजतं कीं दाजी नाबर पुढं नांवाला, महामायेचं अबदागीर ! मांगं तो भाऊ कुळकर्णी आणि गुणाजी नाडकर्णी, तो वसंत बापला आणि बाळ्या नाबर, भांचोद, सगळीं बामणं कशीं एक झालीत. बेत करून आहेत, मसलती सुरू आहेत. '

' अण्णा, हें काय रे बोलणं तुझं ? नाहीं म्हणजे मोठीं माणसं तीं, वजनदार, अब्रू असलेलीं. ' लोकांचं इमान उचंबळून येई. कधींकाळी खाल्लेल्या अन्नाची आठवण होई. अण्णागुरुजीला तीं मध्यंच तोडत. बोलूं देत नसत. बोलूं लागला कीं मोठमोठ्यानं हंसत, जाम हूर्यो घालीत. सांगत, ' शाळेंत पोरांना शिकव हें. तीं एक ऐकून घेतील. आम्ही नाहींतरी मोठीं झालोंत अण्णा. '

अण्णागुरुजीला कुठं हें कबूल होतं ? त्याच्या मतें गांवचीं लोकं वाढली आहेत वयानं. याची बुद्धि त्याच्या शाळेंतील पोरांपेक्षांहि कमीच होती. तो इतका जीव तोडून सांगत होता. सांगत होता त्यांच्या भल्या-साठीं, हिताचं. स्वतःला एक कळत नाहीं. धोरणच नाहीं तें ! पण ज्याला कळतं त्याचं तरी निदांन ऐकावं ? बिलकुल नाहीं ! सगळाच पोरकटपणा. हंः हंः करून हंसतील, छाः छाः करून ओरडतील. हीच यांची अक्कल. ती वाढणार नव्हती. कधीं कधींच नाहीं आतां इतकीं वर्षं तो अनुभव घेत होता !

म्हाताऱ्याच्या अंगाची लाही लाही होई. संतापानं तो पांढराफटक पडे. थरथर कापूं लागे. आणि तसं अण्णागुरुजीचं अवसान गळून जाई. आत्मविश्वास पार खाक होई. खेटरं मारल्यासारखं थोबाड दिसे.

अनुक्रमणिका




रुद्राक्षाची माळ चाळवीत 'हे राम, हे राम' असं पुटपुटत तो रस्त्याला लागे. काठी टेकीत. खाल मानेनं, जखमी मनानं.

नाईकाच्या दुकानावर असंच कायसं झालं होतं. रामनामाचा जप करीत अण्णागुरुजी घराकडे निघाला होता. पायवाटेनं मधली डोंगर-घाटी चढून तो तळपीवर आला. उभी चढण. या वयांत अण्णाला आतां खरस लागे. अंमळ दम खाण्यासाठीं बाजूला दगडावर तो टेकला. आणि तसं सहज लक्ष गेलं.

म्हणजे ? म्हणजे ?

हा प्रकार काय ? त्याला कळेना. भरदुपारला गांवची ही बडी बडी मंडळी डोंगरावर काय उद्योग करीत होती त्याला समजेना.

बामणांची मसणवट तिकडे, खालीं ओझरींत होती. शिवाय कोणाचं बरवाईट झाल्याची बातमी गांवांत नव्हती. तसं कांहीं असतं तर अण्णागुरुजीला तें कळल्याखेरीज राहिलं नसतं. तेव्हां ही तयारी कोणाच्या मर्तिकाची तरी खास नव्हती.

मग–मग ?

कुतुहल त्याला स्वस्थ बसूं देईना. तो उठला. पुढं झाला. उन्हाची तिरीप उभी डोळ्यावर येत होती. कपाळावर हात घेऊन म्हातारा बघूं लागला. आतां या वयांतसुद्धां त्याची दृष्टि तशी शाबूद होती.

तो असा बघत उभा आहे तर पोलीस पाटलानं त्याला पाहिलं. जोरांत सादच घातली, 'गंगल्या रेडकरा, तुझं बाबा इथं काय काम ?' आजूबाजूं तो आवाज पडसादत उठला.

म्हाताऱ्यानं तितक्याच जोरांत जाब केला, 'अण्णागुरुजीला गंगल्या म्हणणारा हा प्राणी कोण म्हणून बघत होतों. काय ?'

यावर पोलीस पाटील हंसला नसता तरच आश्चर्य ! त्याच्या दृष्टीनं मोठाच विनोद झाला होता. तो पोटभर हंसला आणि वर म्हणाला, 'होय, होय ! खरं तुझं ! तूं अण्णागुरुजी झालास नव्हे ? विसरतोंच हें.'

'अरे विसरणारच ? कांहीं लागतं तर नसता विसरलान.' अण्णा-गुरुजीनं म्हटलं.

'झक मारली ! आणि तुला साद घातली.' पोलीस पाटलानं जाहीरपणं चूक कबूल केली. कारण अण्णागुरुजीच्या तोंडापुढं त्याचा पाड नव्हता. पोलिसी बडगाड्याला भीक न घालणारीं गांवात जीं थोडीं माणसं होतीं त्यांत हा म्हातारा पहिला होता.

पण तसं भाऊ कुळकर्ण्यानं चष्मा वरखालीं करीत ताणलं, 'अण्णा, गांव टाकून डोंगरांत कसा काय शिरलास रे !'

'गांवकीची बैठक उभी दिसली. म्हटलं काय प्रकार आहे बघावा.

'छाः ! कसली गांवकी आणि कसला प्रकार अण्णा !' गुणाजी नाडकर्णी बत्तिशी फाडून साखर पेरीत म्हणाला, 'अरे, कित्येक दिवस चाललं आहे, डोंगरावरच्या हद्दी तपासून घ्याव्यात. काय ?

अण्णागुरुजी मान हलवीत म्हणाला, 'मला वाटलंच !'

बाळ्या नाबरानं मध्येंच विचारलं, 'काय वाटलं ?'

'हेंच. जमिनीच्या संबंधांत कांहींतरी भानगड असणार. तलाठ्याला पाहिलं तेव्हांच अजमास केला.'

...पान ५२ वर











# एकत्र गुंफुन जीवित धागे

—पद्माकर गोवईकर



**'...सनातन वेदनांच्या कल-हाचं वादळ जाणिवेच्या विशाल आभाळांत भरकटलें–आणि लेखकाचीं अतृप्त दिवास्वप्नें लेखणींतून ओघळतात. प्रत्यक्षांत घडावींत असं वाटायला लावणारीं—**

उज्ज्वला ! आठवतात ते दिवस तुला ? फुलपांखराच्या पंखासारख्या पापण्या फडफडवून तुझे काळेभोर डोळे त्या दिवसांवरून फिरव. त्या गडद गडद निळ्या आठवणींचं थंड अंजन किती पिऊं नि किती नको असं होऊन जाईल त्यांना. फुलाच्या सहजतेनं रात्रीच्या कळ्या उमलत होत्या. प्रत्येक क्षण चांदणं होऊन उगवत होता. संथ लयींत दिवस जात होते. जमिनीवरून चालायला तयारच नव्हतो आपण. उंच उंच आकाशांतून भरारत होतो. अवकाशाचा वेध घेत. सूर्य–चंद्र उगवत नसलेल्या आभाळाचं स्वप्न पहात होतों आपण.

त्या साखरदिवसांत किती आतुरतेनं, ओलाव्यानं माझ्याकडे यायचीस ! आठदहा दिवसांतून एकदां माझ्याकडे तुझी फेरी असायची. आलीस कीं तुझी बडबड सुरू असायची. यंत्रासारखी कॉलेजच्या गोष्टी ऐकवायचीस. हे प्रोफेसर असे आहेत, मी संस्कृतमधें हायस्ट् आलें, तीं मुलं मला तुमच्या नांवानं चिडवतात. एक ना दोन. कांहीं नाहीं टकळी चालू असायची. आढ्याकडे पहात मी माझ्या मळक्या गादीवर पडलेलो असायचो. 'हुंऽ हुंऽऽ' करीत. उदास. गप्प. गप्प. आणि मग बोलतां बोलतां तूं एकाएकी थांबत होतीस. मी बोलत नाहीं हें तुझ्या लक्षांत यायचं. तूं रागावायचीस. मला गदागदा हलवून म्हणायचीस,



अनुक्रमणिका

'तुम्ही बोलकी हो कांहीं तरी. इतक्या दिवसांनीं आम्हीं यायचं आणि तुम्हीं तेवढे गप्प...'

'मला नाहीं बोलतां येत. तूंच बोल.' मी कडवटपणें म्हणायचो.

सगळ्या आयुष्यावरचा राग मी तुझ्यावर काढीत होतों. माझ्या बोलण्यांतला कडवटपणा तुला बोचत होता. पण तो कडवटपणा तूं सवईनें सहन करीत होतीस. तूं कॉलेजांत शिकत होतीस. इतर बाबतींत तुझें मन प्रौढ झालेलें होतें. पण माझ्या विषयीं विचार करतांना तुझें मन भावडं व्हायचें. मी कितीहि झिडकारलें तरी तूं पुन्हां माझ्याशीं बोलूं लागायचीस. तूं ठरविलें होतेस, कीं लग्न झाल्यावर मला बोलका करायचं. प्रश्न विचारून विचारून अगदीं भंडावून सोडायचें. मी चिडलों तरी बोलत राहायचें. मला हंसरा ठेवायचें. आनंदी ठेवायचें. तूं पुन्हां म्हणायचीस,

'बोला ना.'

सुकलेल्या ओठानें मी हंसायचो. तुझा हात हातांत घेत मी म्हणत असे,—

'तूं मला फार आवडतेस; पण काय बोलायचं, ग ? मी कांहीं कॉलेजला जात नाहीं कीं कांहीं नाहीं. तुझ्यासारखीं चार गांवें सुद्धां हिंडलों नाहीं. काय सांगणार मी तुला...!'

माझ्या या बोलण्यानें वातावरण एकदम बदलून जात असे. माझा त्यावेळचा रुद्ध स्वर तुझें काळीज फाडत आंत घुसायचा. तुला वाटायचं मी रडतो आहे. पण मला रडताही येत नसे. माझ्या डोळ्यांवरून तुझीं लांबसडक बोटें फिरवीत तूं म्हणायचीस,

'असं कां बोलतां तुम्ही. मला वाईट वाटतं. मी तुमच्यासाठींच शिकते आहे ना...'

आणि मग पाहतां पाहतां तुझें हळवे डोळे भरून यायचे. भावनेच्या उत्कटतेनें आणि सहवासाच्या तृष्णेनें तुझी व्यथा भिजून जायची. कितीतरी वेळ वर्षाकाळ चालू राहायचा. एरवीं विरहानें रडायचीस.

कितीतरी मुके क्षण तुडतुडत जायचे. मी तुझ्या रुमालानें तुझें ओले डोळे पुसत राहायचों. तुला उगी करायचों. तुझें भावनेनें मन अधिकच हुंदके देत राही.

केव्हांतरी एका बिंदूवर तूं उतरायचीस. ओल्या पापण्यांचे पंख फडफडवीत तूं माझ्याकडे पाहात राहायचीस. विचारायचीस,

'तुम्हीं असं कां बोलतां ? स्वतःकडे असा कमीपणा कां घेतां ?'

मी तारवटल्यासारखा बोलत असें,

'आयुष्यावर फारशी श्रद्धा राहिली नाहीं, उद्या यांतून कांहीं होईल असा विश्वासहि राहिला नाहीं. आणि माझ्या आयुष्यांतील सर्वांत बहुमोलाची गोष्ट तूं आहेस. वाटतं, कीं तुझी फसवणूक होऊं नये. तुझ्या प्रेमाची थट्टा होऊं नये. माझी परिस्थिति मध्यम आहे...'

माझें बोलणें मधेंच अटकायचें. कारण त्याचवेळीं तूं उठलेली असायचीस. गुदमरली होऊन पाठमोरी व्हायचीस. निश्चयानें बोलायचीस,

'मला फक्त तुम्हीं हवें आहांत. फक्त तुम्ही... तुमच्या आकांक्षा, तुमचीं स्वप्नें मला हवींत. मला तुमच्या जगांत थोडी जागा हवी आहे. जाते मी...'

दार लोटलें जायचें. तुझ्या दूर जाणाऱ्या पावलांचे आवाज कांहीं काळ येत रहात. आणि मग माझें मन रितेपणानें भरून येई. कातरून जाई. उशींत तोंड खुपसून भरल्या संध्याकाळीं मी मुळुंमुळुं रडत राही.

यावर दहापंधरा दिवस निघून जात. मी दिवसेंदिवस उदास होत होतो. आपल्यासारख्यासाठीं हें जग नाहीं. हळुवार मनाच्या कलावंताला नोकरी करावी लागावी. रोज कुणाच्या तरी करड्या आवाजांतलें हलकट बोलणें ऐकावें लागावें, याचा माझ्यावर परिणाम होत होता. मोठा गायक व्हावें, कलावन्त व्हावें अशी माझी मनीषा होती. वास्तवतेकडे पाठ करण्याचा मी प्रयत्न करीत होतो. स्वतः-बद्दल मी कांहीं वेगळ्या कल्पना करून घेतल्या होत्या. कल्पनेंतल्या त्या विश्वाकडे मी धांवत होतों.

प्रमिष्ट कलावन्त ज्या क्षणीं आत्महत्या करतो तो क्षण चुकवीत मी जगत होतो. दुर्दैव पांघरून ओसरणाचे कोसच्या कोस मी प्रवास करीत रहायचों. एकटा. एकूर जनावरासारखा मी माझ्या मनोवनांत भटकत असायचा. विषण्णपणें आयुष्याचा अर्थ लावीत असायचों. दैवी असंबद्ध तेचा अर्थ लावीत असायचों. माझें तें निराकार दुःख तुला कधीं कळलेंच नाहीं. मी मोकळेपणानें तें तुला सांगावें अशी तुझी तीव्र इच्छा असे. आणि अगदीं जवळच्या माणसालाहि आपल्या रडकथा ऐकवाव्यात या विरुद्ध मी होतों. निवून पडलेल्या पालथ्या आयुष्याकडे पहात मी दिवस काढत होतों.

मनाला मुंग्या आलेल्या त्या काळांत तूं पुन्हां कधीं तरी माझ्याकडे यायचीस.

त्या दिवशीं सकाळींच आली होतीस. कॉलेजचा पिरिअड बुडवून आली होतीस. मी माझ्या गादीवर पडलों होतों. ज्ञातविश्वाच्या चौकटी बाहेर पडण्याचा विचार करीत होतों. आणि हलकेंच दार उघडून तूं आंत आलीस. तुझा सुस्नात चेहरा उत्साही वाटत होता. बागेश्रीसारखी न्हालेली. रक्तवर्णी वाटत होतीस तूं. चपला काढीत तूं बोललीस,

'राजन्...मी आले...'

मी बावचळलों. मला आश्चर्य वाटलं. सकाळींच माझ्याकडे आलीस म्हणून. मला गादीवर पडलेला पाहून तूं चिडलीस,



**वार—**

मी रक्तानें लिहिलेलें
रक्ताला नच कळलें
रक्तानें पण रक्ताला
लक्षवार नागविले

या रक्तानें रक्ताचा
दिनरात खून केला
या रक्तानें रक्तावर
प्रीतितून वार केला

**खूणठसा—**

वळणारच तर वळ घेऊन
वळण नवें चंद्राच्या ढंगानें
वळणावरतो थांब जरा
दे निरोप ओल्या डोळयानें

जा इथें विसरून गाणें
राहूं दे ओठांना दिलासा
या शब्दांच्या राऊळात इथें
राख सखि दिव्याचा खूणठसा

**ठसा—**

नजरेची ज्योत निळी
श्वासांचें परकेपण...
ओंठ सांगतात आर्त
गाफिल ते गेले क्षण

या ओंजळी रित्या...रित्या
हात स्पर्शतात तम
शब्द सोडुनी मनांत
चुकलेलें सारेजगम्

दीन मुके, श्वास क्षीण
शोधतात भास खुळा
भोंवळ रक्तात भिनें
सूर झुलवितो गळा

शब्द फाटलेत इथें
श्वास दुभंगला असा
नजरेच्या ज्योतिवर
प्राणाचा जळत ठसा

—श्रीकांत पुरोहित

'सारखे असें कां हो पडलेले असतां ? मला नाहीं आवडत. किती विचार करणार आहांत ?

'अग, बैस तरी, एकदम काय रागावतेस ? मी कृत्रिम प्रेमळपणा दाखवीत असे.

'तुम्हीं आधीं उठून बसा...'

मी उठलों डोकें झटकलें. तुझ्याशीं समरस व्हायचा प्रयत्न करूं लागलों. तूं पुस्तकें माझ्या गादीवर ठेवून हात मागें नेत मला विचारलेस, 'मी तुमच्याकरितां काय आणलंय ओळखा ?'

तुझा हंसरा चेहरा पाहून मला बरें वाटलें. मी विचारलें,-

'काय आणलंयूस ? '

'तुम्हीं ओळखा. मी नाहीं सांगणार...'

'खारे काजू...? 'मी ओळखण्याचा प्रयत्न केला.

'नाहीं.' त्या 'नाहीं' मधें तुला वाईट वाटलं होतं. खारे काजू आणायचें हें तुझ्या मनानें टिपलें. कारण पुन्हां दोनच दिवसानें तूं माझ्याकडे नुसती काजूची पुडी द्यायला आली होतीस.

'मग काय ?' मी विचारलें.

'सांग नं..!' तूं मानेला लाडीक वळण देत म्हटलेस.

मी दोनचार क्षण उगाचंच आठवण्याचा अभिनय केला. तेवढ्यांत तूं माझ्या हातांत एक कागदाचें पॅकेट ठेवलेस. माझ्याकडे पाहूं लागलीस...मी पॅकेट उघडून पाहिलें. मला गलबलून आलें.

गेले आठपंधरा दिवस जी गोष्ट मी आळशी-पणामुळें आणायची राहून गलो होतो, ती तूं केली होतीस. तंबोऱ्याच्या तारा. गेले कांहीं दिवस माझा रियाझ बंद होता. मी तो मुद्दामच बंद केला होता. दुसऱ्यांचीं आयुष्य पाटीवर वाहून नेतां नेतां कलेची उपासना करण्यापेक्षां उघड्या डोळ्यांनीं त्याकडे दुर्लक्ष करावें असें मी ठरविलें होतें. आणि आज तूं तारा आणल्या होत्यास. मी 'छान' इतकेंच म्हणालों. मला आयुष्यांत तोंड भरून कौतुक कुणाचेंच करतां आलें नाहीं. तूं खट्टू झालीस. हें मला समजलें पण या खेरीज मी कांहीं करूं शकलों नव्हतो. नसतो. तूंच न राहून म्हणालीस,

'आतां मला मारवा गाऊन दाखवा.'

मी चकीत झालों. गाण्यांतली तुला कांहीं माहिती नसेल अशी माझी समजूत होती. मीहि तुझ्यापुढें गाण्याचा विषय कधीं काढीत नसे. सुशिक्षित घराण्यांतली तूं गाण्याबजावण्यां-कडे कुत्सित अर्थानें पहात असशील अशी माझी समजूत होती. तिथेंहि मी कमीपणा घेतला होता. पण आतां माझा दंड हलवून तूं मला पुन्हां पुन्हां सांगत होतीस,

'उठा नं, मला मारवा गाऊन दाखवा..'

'अग, पण सकाळची वेळ आहे...'

'असूं दे, उठा आधीं...'

असं म्हणत तूं तंबोऱ्याची गवसणी काढलीस. मी नाखुशीनें उठलों. तारा जोडल्या आणि 'मध्यम' 'धैवताच्या' झणत्कारांत जीव एकवटून मी मारवा गायलों. अर्धा-पाऊण तास तूं हलून गेली होतीस. माझा दुसरा जीव माझ्या समोर बसून हरवून गेला होता. मी डोळे उघडून मारवा संपविला. तुझ्याकडे पाहिलं. तों तुझ्या डोळ्यांत पाणी तरारलं होतं. मी तंबोरा खालीं ठेऊन तुझ्या जवळ येऊन तुला विचारलं,—

'किती हळवी ग, तूं...!'

'फार चांगलं गातां तुम्ही. सहज होत नाहीं इतकं चांगलं'

'काय होतं ?'

'बालकवींची कविता आठवते...'

'कुठली ग ?'

'ती पारव्याची. जुनी पडकी उध्वस्त धर्म-शाळा...आणि वाटतं, त्या उध्वस्ततेच्या छपरावरचा खिन्न, नीरस गीत गाणारा पारवा तुम्ही आहांत...'

'कां वाटलं असं तुला ?'

'कोणं जाणे ! वाटलं खरं...'

आणि तो पारवा मग किती तरी वेळ खिन्न गीत गात राहिला.

एकाएकी माझ्या शर्टच्या गुंडीशीं चाळा करीत तूं मला विचारलंस, 'राजन्, आपण लग्न केव्हां करायचं... ?'

'असं एकदम कां तूं विचारलंस ? मी तुला विचारलं.

'तुमचं गाणं ऐकलं, कीं वाटतं तुमच्या सहवासांत सारखं असावं.' तुमच्या मनांतल्या त्या दुःखी पारव्याला आधार द्यावा.'

मी कांहीं बोललों नाहीं. मला लग्नाचा विषय आवडत नसे. खूप पैसा असल्याशिवाय माणसानें लग्न करूं नये. दारिद्र्यांत दोन पैशाचं तेल आणि एक आण्याची हळद आणण्यांत संसार करण्यापेक्षां माणसानें लग्न करूं नये. कुणाच्या आयुष्याचं पोतेरं करूं नये. आपली कर्तुकही बांझोटी टेऊं नये असं माझं मत होतं. तें तुला टाऊक होतं. तूं मला पुन्हां विचारलंस,






'जगांत काय सारेच श्रीमंत असतात?'

'पण ज्याच्याशीं दोन दिवस सुद्धां काढता येणार नाहींत त्याच्याशीं सारा जन्म तूं कां काढतेस? खरं सांगू, तूं कुणी तरी सुशिक्षित, बंगलेवाला...'

'गप्प बसा. बोलूं नका पुढं...'

रागानं तुला बोलतां येत नव्हतं. तुझे ओठ थरथरत होते. माझ्या चिरविरहाला तुझ्या कल्पनेंतहि थारा नव्हता. अंधाऱ्या माळ्यावरल्या खोलींत एकाकी उन्हाचा कवडसा पडावा तसा लग्नाचा विचार तुझ्या मनांत ठसत असायचा. केव्हांना केव्हां तरी तो खरा ठरणार या समाधानावर तुझें मन उसंत घेत होतं.

'माझ्या प्रेमाचा असा पुन्हां अपमान करूं नका.

'अग, पण माझं ऐकून घे...'

'मला कांहीं ऐकायचं नाहीं. जाते मी...'

कपाळावर आठ्या घालून तूं निघून गेलीस.

आपल्या लग्नाबद्दल, लग्नानंतरच्या सुखी आयुष्याबद्दल मी कांहीं गुलगुल बोलावें अशी तुझी इच्छा असे. मला तें जमायचं नाहीं. खुळेपणा वाटायचा. मी गप्प बसायचों. तुझं बोलणं ऐकत राही.

अन् मग तुला वाटायचं मी बोलत नाहीं. 'तुम्ही बोला ना, बोला ना...' अशी तुझी टकळी चालायची. मला काय बोलायचं कळायचं नाहीं. तूं चिडायचीस. अशी कांहीं विलक्षण परिस्थिती मी अनुभवली होती, कीं तुझ्या भोवळ्या विश्वांत मला व्यवहाराचे पंख तोडून शिरतां यायचं नाहीं अनुभवाच्या झोंबाझोंबींत माझ्या गोंडस भावनांचा चुराडा झाला होता. तो एक तकलादू खेळ वाटायचा. माझ्या मनाची घडणच कांहीं वेगळी होती. आणि आपल्या सुगंधी भेटीचा बेरंग होऊन जात होता. तूं चिडून जात होतीस.

'मला बरं वाटेल असं तुम्हांला कांहीं बोलतांच येत नाहीं...' असं म्हणून तूं निघून जायचीस...

तूं निघून जायचीस आणि पुन्हां मी रिता राही. विचार करूं लागे. माझ्या आयुष्याशीं तुझी सांगड कशी जमायची? तुझ्या प्रेमाचा, भावनेचा आदर ठेवायचा तर तुला विसरून जावं कां!

पण तुझ्या हळव्या अंतःकरणाला दुखविण्याचं धारिष्ट्य मला होत नसे. 'तूं लवकर ग्रॅज्युएट हो, मग आपण लग्नाचं बघूं...' असं मीं तुला सांगत होतो. आणि केवळ माझ्यासाठीं तूं शिकत राहिलीस. वडिलांच्या माघारी नोकरी करून शिकत राहिलीस. माझ्यांतली शिक्षणाची उणीव भरून काढूं लागलीस. माझ्या चांगुलपणावर विश्वासानं मान ठेवून तूं त्या मंगलक्षणाची वाटचाल करीत होतीस. तुझा बी. ए. चा निकाल लागला त्या दिवशीं मी दूर कोंकणांत माझ्या बहिणीकडे होतो. तिथून मी तुला पत्र लिहिलं होतं–

'...तूं पास झालीस. फार बरं वाटलं मला. तुझं अभिनंदन करण्याची माझी वास्तविक पात्रता नाहीं. पण एवढं खरं कीं, मी स्वतःच पास झाल्याच्या आनंदांत आहे...

त्यावर तूं किती रागावली होतीस!...

आपली शेवटची भेट तुला आठवते?

एका धूसर भुरक्या संध्याकाळीं अशींच तूं मला भेटायला आली होतीस. काळोख सांवल्या एकमेकांत मिसळून जात होत्या.

एकेक चांदणी आकाशांत चमकत होती. आकाश त्या स्पर्शानं पुलकित होत होतं. धुवाधार संधी प्रकाशांत आपण गडाच्या बुरजाजवळ उभे होतो. तूं लाजेनं, संकोचानं मुकी झाली होतीस. मी भरावून गप्प होतों. बोलायचं जणूं विसरून गेलों होतों. मला भेट द्यायला आणलेला ग्रंथ छातीशीं धरून, डोक्यांत चांदणं माळून तूं उभी होतीस. कातर स्पर्शानं मी तुला जवळ ओढलं. तूं अधिकच लाजलीस. चांदणं प्यालेल्या ओठांनीं हंसलीस. जुन्या व्यथा विसरूण तो बुरज हंसला. ती भोळी संध्याकाळहि हंसली. तूं दूर सरकलीस. तुझ्या हातांतला ग्रंथ घेऊन मी पहिलं पान उलटलं. डोळ्यांतल्या काजळानं तूं त्यावर लिहिलं होतंस—

'वाट पाहतें, तुझी अशी मी,
तृप्त सुखाच्या निवान्त कुरणीं...
वाट पहातें तुझी अशी मी,
वाटे परि भाओत्कट होऊन–
वाटच होऊन––
वाट पाहतें तुझी अशी...'

किती ध्यास हव्यासानं माझी वाट पाहात होतीस तूं. माझ्या नुसत्या वाट पहाण्यांत तूं तृप्त होतीस. तुझ्या भाववेड्या प्रतिभेला जवळ घेऊन मी कानांत विचारलं,

कां माझ्यावर इतकं प्रेम करतेस तुझ्या या वाट पहाण्याची अखेर आपल्या मीलनांत होणार याची खात्री आहे कां?...

...पान ४६ वर



**फूल––**

लावूनी गेलें
निरवतेच्या गालावरती
कडाडणाऱ्या तप्त विजेचे
पिसं रुपेरी

त्याच क्षणी अन
नाजूक...भिन्या वसुंधरेने
वट्ट जरासा धरला होता
आभाळाचा रंगीत शेला

आणि धरेच्या
थरथरत्या वक्षांना
हळुच सावरीत
आभाळ म्हणालें,

'वधीतलेस तूं
अंधाराला आलेले ते
फूल विजेचे'

**किनारा––**

निळ्या नभाच्या मिठींत
नाही चांदणें नितळ
खोल पाण्याच्या तळाशी
फक्त कोरडा कातळ

सारा तमाचा सागर
माझी व्याकुळली दिठी
आता उरात मावेना–
क्षुब्ध वादळाची गती

मुक व्यथेत दडला–
तुझा 'काडीचा सहारा
आज लाटांच्या ओढीत
माझा बुडला किनारा

—मनोहर वराडपांडे

...झाले बहु–होतीलहि बहु... पण तिच्या सारखी सुन्दर तीच ! अंगानें उभी–आडवी सुटलेली. चेहऱ्यानें पसरलेली. तरी पण आपण नाजूक आहोत...ह्याच तोऱ्यांत तिनं शिवी हासडली...कारण तिच्यासारख्या लवंगिला उचलायला तिघं लागले होते...!



सौ. माधवी मधुकर बिडकर

# मी नाजूक आहे

देसायांच्या वाड्यांत यावेळीं गडबड आहे. रोजच्याप्रमाणंच गोंधळ आहे. तिथं कुणाला उसंत नाहीं. कुणाला निवांतपणें गप्पा मारीत बसायला सवड नाहीं, तरी सुद्धां एकमेकींच्या कानाला लागून कुणाची तरी उणीदुणीं निघताहेत. हास्याच्या उकळ्या फुटताहेत. रस्त्यावरून जाणारा भीक मागायला येणाऱ्या लोकांचा तांडा येऊन गेला आहे. गटारं अन् मोऱ्या साफ करणारी यमनी दारांत येऊन थबकली आहे.

दारानजीकच्या तीन खोल्यांत देशपांडे रहतात. सौ. देशपांड्यांशीं या यमनीची जास्त घसट आहे. यमनी साऱ्या गांवातल्या उचापती सौ. देशपांड्यांना सांगत असते. अन् त्याबद्दली ती शिळी भाकरी, रात्रीची भाजी नाहींतर शेर-अर्धाशेर पीठ वसूल केल्याशिवाय रहात नाहीं. देशपांडे सुखवस्तु आहेत. त्यांची तिन्हीं मुलं चांगल्या पगारावर नोकरीला आहेत. मुली चांगल्या घरीं नांदताहेत. सुनांशीं पटत नाहीं म्हणून ही नवराबायको इथं राहिलीं आहेत. देशपांडे मधुमेहानं आजारी असतात. त्यांच्या पायाची जखम चिघळत आहे. त्यांना दमा सोसवत नाहीं. खोकून खोकून त्यांच्या बरगड्या ढिल्या होताहेत. तें मधल्या खोलींत दारासमोरच्या कॉटवर पडून असतात.

त्यांच्या मानानं त्यांची पत्नी तरुण दिसते. सौ. देशपांड्यांचे गाल गोबरे आहेत. टपोऱ्या डोळ्यांत नेहमीं काजळ असतं. डोळ्यांत चमक असते. चार मुलं होऊन त्यांच्या डोळ्यांतली धुंदी उतरलेली नाही. मादकता कमी झालेली नाहीं. त्यांच्या कपाळावर रेखीव टिकली असते. दिसेल न दिसेल अशा बेतानं त्या ओटांखालीं हनुवटीवर नाजुकसा काजळाचा टिपका देतात. तो त्यांना शोभून दिसतो. भरघोस केसांच्या अंबाड्यावर वेणी माळलेली असते. लुसलुशींत तांबूस बोटांत अंगठ्या आहेत. कानांत फॅन्सी कुड्या आहेत अन् हिरव्या बांगड्यांसमवेत असलेल्या सोन्याच्या दोन बांगड्यांशीं चाळा करायची त्यांना संवय आहे.

वाड्यांतल्या इतर बिऱ्हाडांपेक्षां या बिऱ्हाडाशीं यमनीचा जास्त परिचय आहे. सौ. देशपांड्यांना सारा वाडा ताई म्हणून संबोधतो. ताई म्हटल्यावर त्यांना बरं वाटतं. त्या खुश होतात, हें अनुभवानं साऱ्यांना पटलं आहे. ताई म्हटल्यावर बऱ्याचजणांना चहापोहे मिळाले आहेत. ताईंना बोलतां बोलतां डोळे





लहानमोठं करायची संवय आहे. चार मुलांची आई झाली तरी तिचा रंगेलपणा कमी झालेला नाहीं. अशाच कांहीं गोष्टी यमनीकडून त्यांना ऐकायला मिळतात अन् त्यांही यमनीला सांगत असतात. अन् म्हणूनच यमनीचं अन् त्यांचं पटतं.

आतांसुद्धा यमनी ताईच्या दारांत येऊन बसली आहे. ताई दारांतच पतकाला मारून बसल्या आहेत. डाळींबी रंगाच्या साडीवर हिरवा गर्द रेशमी ब्लाऊज त्यांना शोभून दिसतो आहे. त्यांनी ढीगभर मटारच्या शेंगा सोलायला घेतल्या आहेत. मटार सोलतां सोलतां त्या बोलताहेत. यमनीच्या गृहसौख्याची आस्थेवाईकपणे चौकशी करताहेत. शेजारीं असलेल्या मोरीवर मोलकरणी धूताहेत. वाड्यांतल्या इतर बायकाही धुण्यासाठीं धुण्याच्या बादल्या घेऊन नंबर लावून उभ्या आहेत. त्यांच्या त्यांच्यांत बोलणीं चाललीं आहे. विनोद होताहेत ‘ अय्या ! इश्य ! ’ ची खैरांत उडते आहे.

वाड्यांतल्या कोपऱ्यांत मोठा हौद आहे. या तिनैटच्या हौदानजीक धुण्यासाठीं मोठा धोंडा ठेवला आहे. प्रशस्त मोरीत वाड्यांतलीं सारी बिऱ्हाडं धुणीं धूत आलीं आहेत. या पाण्याच्या हौदाच्या बाहेरच्या बाजूला साबण पाण्याचे थर सांचले आहेत. धुण्याच्या दगडा खालचं सिमेंट उडालं आहे. फरशी बुळबुळीत होतें आहे. नळाची फिरवायची चपटी चावी उखडून निघाली आहे. जमलेल्या बायका मालकाच्या नांवानं कोकलताहेत.

मोरीजवळचं गटार तुंबलं आहे. साबणाचा फेस पाण्यावर तरंगतो आहे. धुण्याच्या दगडाजवळ घोटाभर पाणी सांचलं आहे. आता कुलकर्ण्यांच्या यमुना काकूंचा नंबर आला आहे. यमुनाकाकू स्वच्छतेनें अन् टापटीपीनें राहतात. या वांझोट्या स्त्रीला घाण सहन होत नाहीं. घरांतल्या घरांत ती दहा दहा वेळ केराचा कुंचला फिरवीत असते. दर चार-दोन दिवसाआड ती फळीवरचे सारे डबे घासून पुसून स्वच्छ करते. दिवसांतून दोन-चार वेळा ती कपडे बदलते. स्वतः बरोबर नवऱ्यालाही कपडे बदलायला लावते. रोज असेच ढीगभर कपडे धुवायला काढते.

वाड्यांतल्या स्वच्छतेवर या बाईचा जास्त डोळा आहे. स्वच्छतेबाबतचे सारे अधिकार आपल्याकडे आहेत, आपणच या वाड्याचे मालक आहोंत अशा थाटांत त्या कमरेवर दोन्हीं हात ठेऊन फिरत असतात. रस्त्यावर केर झालेला त्यांना आवडत नाहीं. संडास मुलांनीं घाण केलेले तिला खपत नाहीं. एकूण मुलांनी केलेली स्वच्छता तिला साफ नामंजूर आहे. दर दिवसाआड या असल्याच गोष्टीवरून त्यांच कुणाशींतरी भांडण होत असते. या ढब्या यमुनाकाकूंना भारी तोंड आहे. भांडण सुरूं झालं कीं ती तासन्तास बडबडत राहते. तिच्याशी भांडणाराला भीक नको पण कुत्रा आवर म्हणायची पाळी येते. सहसा तिच्या नादाला कुणीं लागत नाहीं. पाठीशीं हात बांधून ती वेळीं अवेळीं कुणाच्याही घरांत बेधडक शिरत असते. प्रत्येक बिऱ्हाडांतल्या भानगडी अन् लफडी तिला ठाऊक आहेत. कुणाला किती कर्ज आहे. कुणाच्या अंगावर नकली सोनं आहे ? कुणाची भांडी गहाण पडली आहेत कोण कुणाकडं पाहून हंसते—बोलते. हे त्यांना सारं माहिती आहे. आपलं गृहछिद्र चव्हाट्यावर येऊं नये म्हणून जो तो जपतो अन् या महामायेशी भांडण करायचं टाळतो.

यमुनाकाकू कमरेवर हात ठेऊन उभ्या आहेत. त्या घाण पाण्यांत घोट्याइतके पाय बुडऊन धुणं धुवायचं त्यांच्या जीवावर आलं आहे. बाजूला चिंध्या पडल्या आहे. नारळाच्या केसराच्या घासण्या अन् मातीही पडली आहे. मोलकरणींनीं खरकटी तींथंच ओतलेली आहेत. पाण्यानं पाणी वाढणार आहे. साबण पाण्याचा उग्र भपकारा येतो आहे. तो ओंगळ प्रकार पाहून त्यांच्या तळपायाची आग मस्तकाला गेली आहे. त्या चिडल्या आहेत. चडफडत आहेत. यमनीकडं रागारागानं पहाताहेत. ही मोरी साफ करण्यासाठीं दरमहा वाड्यांतून वर्गणी काढून पांच रुपये यमनीला दिले जातात. असं असतांही ती आरामांत बसून ताईशीं गप्पा मारते आहे. या असल्या घाणींत धुणं धुवायला लावण्यासाठींच मुद्दाम ती दुर्लक्ष करतें आहे असं वाटून ती चडफडत आहे. सकाळपासून त्याचं अंग सुस्तावलं आहे. धुणं धुवायचा त्याना कंटाळा आला आहे. पण त्या तीथंच उभ्या आहेत.

यमनीला त्या मोरी साफ करायला सांगताहेत मोरी कुणी साफ करायची म्हणून त्या तिला लडथा सुरांत विचारताहेत. या गडबडीत शब्दानं शब्द वाढतो आहे. यमुनाकाकू तिच्या बापाचा उल्लेख करताहेत. अन् यमनी संतापते आहे. बोलाचाली वाढते आहे. खालच्या खोल्यांतून राहणाऱ्या बिऱ्हाडांतल्या बायका हातांतली कामं सारुन ‘ असली गंमत पुनः जन्मांत पहायला नाही मिळणार !’ म्हणून धांवत दाराशी आल्या आहेत. वरच्या मजल्यावर राहणाऱ्या लोकांचे चेहरे खिडकींतून बाहेर येऊं लागले आहेत. भांडणाला रंग चढतो आहे. ताईचं अन् यमुनाबाईचं पटत नाहीं. दोघीही आपल्या श्रीमंतीचा दिमाख एकमेकींना दाखवायचा प्रयत्न करतात. ताईना मुलंबाळं आहेत अन् यमुनाकाकू वांझ आहेत हीच टोंचणी त्यांना बोचते आहे. यमनी आपल्याबद्दल ताईजवळ कांहीतरी बोलत होती असं समजून त्या आतां ताईना उद्देशूनही कांहीं बोलूं लागल्या आहेत.

‘ या भांडणांत कांहीं अर्थ नाहीं. हे काकूचं गुऱ्हाळ असंच धुणं संपेपर्यंत चालू राहणार म्हणून बाकीच्या बायका पुनः आपआपल्या घरांत गेल्या आहेत. अद्याप यमनीच्या तोंडाचा पट्टा सुरू आहे. ती दमली आहे. तिची उभार छाती वरखाली होते आहे. बोलून संपलं आहे. काय बोलावं म्हणजे या बाईची नांगी मोडेल याचा ती विचार करते आहे. मटारच्या शेंगाची फोलं ताई एका ताटांत घेऊन रस्त्यावर फेकून आल्या आहेत. यमनी आतां मोरी साफ करूं लागली आहे. एक मोठा खडक घेऊन ती मोरीच्या तोंडाशीं ठोसतें आहे. त्या घाणपाण्याचे थेंब अंगावर उडतील म्हणून यमुनाकाकू एका कोपऱ्याला अंग चोरून उभ्या आहेत.

वाड्यांत या वेळीं रोज गडबड असते पण आज त्यामानानं बरीच शांतता आहे. ध्वजारोहणाच्या समारंभाला सारी मुलं शाळेंत गेली आहेत. मोठी माणसंहि सकाळींच उठून ऑफीसला गेलीं आहेत. अद्याप धुण्याचे बरेच नंबर आहेत. नंबराला आपल्या धुण्याच्या बादल्या ठेऊन त्या लेकूरवाळ्या बायका आपआपली कामं करताहेत. यमुनाकाकूशी बोलायला कुणीच उरलेलं नाहीं. यमनी आपलं काम करतें आहे. तिचं पुनः कांहीतरी खुसपट काढावं कीं काय या विचारांनी त्यांना घेरलं आहे. जिन्यावरून दबादबा पावलं वाजवीत येणाऱ्या शीलाताईकडं पाहून पाहून त्यांची चर्या थोडी उजळते आहे. या बावळट पात्रांची टिंगल करण्यांत त्यांचा अर्धातास सहज निघून जाणार होता. मग त्यांच्या जोडीला यमनी आणि ताईही हजर होणार होत्या. शीलाताई सावकाशपणें जिना उतरताहेत. लठ्ठपणामुळें त्यांना आपला

देह आवरत नाहीं. त्यांचा चेहरा सुकलेला दिसतो आहे. केंस विस्कटलेले आहेत. गालावर आलेले ओघळ जसेच्या तसेच दिसताहेत. डोळ्याच्या कडांना लावलेलं काजळ डोळे चोळल्यामुळं विखुरलं आहे.

त्यांच्या हातांत ब्रश आणि पेस्ट ट्यूब आहे. सावकाशपणें जिना उतरून त्या थांबल्या आहेत. त्या धांप लागल्याचा सीन वठवताहेत. आपण नाजुक आहोंत असा त्यांचा भ्रम आहे. वाड्यांतल्या साऱ्या बायकांना मुद्दाम तेंच तेंच सांगून त्या तें पटवीत असतात. इतर बायकांपेक्षां त्यांनीं बरंच वय चोरलं आहे. नवऱ्याचं पंचेचाळीस वय असतांहि त्या आपलं तीस वय सांगतात. दीडशें पौन्डाच्या देहांत वातानं बराच धुमाकूळ घातल्यानं शरीराचा आकार बिघडला आहे. पोटानं आपली मर्यादा सोडली आहे. सरळ उभं राहिल्यावर पायाजवळ काय आहे हेंहि त्यांना दिसत नाहीं. तिरपी मान करून बाजूला पाहणं त्यांना अशक्य होतं. पण तरीसुद्धां आपण सुंदर दिसतो असं त्यांच ठाम मत आहे. वाड्यांतली पुरुष मंडळी आपल्या सौंदर्याकडे चोरून पहातात कीं काय यांचा त्या कानोसा घेत असतात. चालतांना सुद्धा आपल्याला धांप लागते असं त्या सांगतात अन् त्या प्रमाणं नाटक वठवतात.

नळाकडं वळतां वळतां त्या ताईच्या घरांत डोकावत आहेत यावेळीं ताई नवऱ्याला कॉफी पाजीत आहेत. तें दृश्य पाहून शीलाताई नाक मुरडीत पुढं येतात. अद्याप यमनी गटार साफ करायचं काम करते आहे. यमुनाकाकू भिंतीला टेकून उभ्या आहे. मोरीचं तोंड खुलं झालेलं नाहीं. माती आणि चिंध्यामुळं तोंड गच्च बसलं आहे. तें डबकं सांचलेलं पाहून शीलाताईंना मळमळल्यासारखं वाटतं आहे. यमुनाकाकूंना कांहींतरी विषय हवा म्हणून त्या शीलाताईंना उशिरा उठण्याचं कारण विचारतात. प्रकृतीबद्दल आस्थेवाईकपणें चौकशी करतात. शीलाताई लाजून आपल्या पोटाकडे पहातो अन् लाडीकपणें म्हणते आहे,



*'अय्या, गोड पापी दिल्याबद्दल मला नेकलेस देणार! पण ताईला कशाबद्दल?'*

'तसंऽऽकां ही नाहीं हो! अहो रोजच मी या वेळीं उठते! मला विश्रांती घ्यायला सांगितलं ना डॉक्टरांनी; तसं हेच म्हणतात तूं आपली झोप मी करतों सारं!' शीलाताईंचा नवरा एका मोठ्या फर्ममधें अकौंटंट आहे. ही बिचारी! त्याच्या पदरीं पडली आहे. या नाजूक स्त्रीला कांहीं काम होत नाहीं, असं त्या भाबड्याला वाटतं, त्याला कुणी नातेवाईक नाहींत, त्या भोळ्या जीवाला ही नाटक करून फसवत आली आहे अन् तो फसतो आहे, दहा ते सहापर्यंत ऑफीसमधें राबतो अन् घरीं आल्यावर शेण उष्टीं काढतो. तो पहांटे लवकर उठतो. बंब पेटवून स्वतः अंघोळ करतो. स्वतःचं धोतर स्वतःच धुवून तो स्वयंपाकाच्या तयारीला लागतो. कुकर लावून झाला कीं चहा करतो. मुलांना उठवतो. अंघोळी घालतो. त्यांना चहा देऊन शिकवणीला पाठवून देतो. उरलेला थंड चहा वेडावांकडा चेहरा करून पिऊन टाकतो, त्याला यावेळीं सवड नसते. बायको उठायची असते. तिच्यांसाठीं चहा करायचा असतो. तिच्या अंघोळीचं पाणी तापवून तयार ठेवायचं असतं. पोळ्यांसाठीं कणीक मळून ठेवायची असते. भाजी आमटी करूनच मग तो बायकोला उठवतो. ती आळस झाडीत उठते. हाच रोजचा कार्यक्रम ती यमुनाकाकूंना लाडीकपणें दातांना जीभ थटवीत सांगते आहे. बोलतांना दातांना जीभ थटवायची तिला संवय आहे. त्यामुळं एखाद्या लहान मुलाप्रमाणं ती लाडीक बोलते आहे. मुद्दाम ती यमुनाकाकूंना सांगते आहे, 'अहो हे मला कांहीं करूंच देत नाहींत. सारं स्वतः करीत असतात. मी नाजुक आहे नं! मला त्रास झालेला त्यांना अजिबात सहन नाहीं होत. मी नाजूक आहे म्हणून हे मला भारी जपतात!' ती अशीच सांगते आहे यांत मुख्यतः मी नाजूक आहे हेंच पटवायचं आहे.

यमनीचं काम आटोपलं आहे. शीलाताई आता नळापाशीं जाऊन तोंड धुताहेत. एखाद्या म्हाताऱ्या माणसाप्रमाणं ती जिभेवर बोटं फिरवून ओकाऱ्या काढते आहे. यमुनाकाकूंना तें पहावत नाहीं. त्या झटकन् बाजूला होताहेत. अवाढव्य देहाकडं त्यांना पहावत नाहीं. मोरीबाहेर येऊन पदराला हात पुशीत ताईच्या दाराजवळ येऊन उभ्या आहेत. भांडण विसरून त्या एकमेकीच्या कामाला लागल्या आहेत. ती ओकाऱ्या काढते म्हणून तिची चेष्टा करीत आहेत अन् मघाशीं घरांत डोकावून नाक मुरडीत गेली या रागानं ताईहि त्याचा सूड उगवीत आहेत. 'अहो नवऱ्याला घाण्याच्या बैलासारखा कामाला जुंपलाय म्हाळसानं अन् म्हणतेय कशी मी नाजूक आहे! काय धाड भरलीय हो हिला चालतांना धांप लागायला. रस्त्यावरच्या रोड रोलरसारखी फुगलीय कीं!' ताईच्या तोंडचीं असली इरसाल वाक्यं ऐकून काकू अन् यमनी हंसताहेत.

शीलाताईंना अद्याप चहा मिळालेला नाहीं. तो त्यांना आतां स्वतः करून व्यावा लागणार

## कामाग्नि—



आतां मी हा कामाग्नि कसा विझवूं बरें ? सुगंधी पुष्पांचा हार, जलानें भिजलेले वस्त्र, नलिनीची दलें, बर्फाचे तुषार, सुधांशूचे किरण, आणि गंध-पूर्ण चंदन हे सारे उपाय मी करून पाहिले. पण ते या अग्निचें जळणच बनत आहेत.

अमरु शतक

---

आहे. त्यांचा नवरा सकाळीच ऑफीसला गेल्यानं त्यांनाच सारीं कामं करावीं लागणार आहेत. म्हणूनच त्या चडफडताहेत. स्वतःशीं विचार करीत त्रशमधलं पाणी झटकीत त्या जिन्याजवळ आल्या आहेत. धांप लागल्याचं त्यांचं सोंग चालूच आहे. चालतांना त्या लच-कत मुरडत ठुमकत चालायचा प्रयत्न करताहेत. त्या दोघीतिघींच्या हळूंहळूं आवाजांत कांहींतरी चाललेलं आहे. त्यांचं आपणाकडे कांहीं लक्ष नाहीं असं पाहून चडफडत ' घमेंडखोर मेल्या ! ' असं स्वतःशींच बडबडत जिना चढताहेत. मोठ्या कष्टानं त्या एक एक पाऊल उचलीत आहेत. इतक्यांत वरून कांहींतरी पडल्याचं त्यांना जाणवलं आहे. पोटावर पात-ळाच्या घोळांत कांहींतरी वळवळतआहे. एक प्रचंड किंकाळी त्यांच्या तोंडून बाहेर पडली आहे. सारा वाडा दणाणला आहे. ' काय झालं हो ! ' असं आश्चर्यानं म्हणत ताई अन् यमुनाकाकू जिन्याजवळ येईपर्यंत शीलाताईचं मुटकुळं दहा पायऱ्यांवरून गडगडत खालीं आलं आहे.

शीलाताई पालथी पडली आहे. तिचे दोन्ही पाय ताणले गेले आहेत. पातळ अस्ताव्यस्त झालं आहे. यावेळीं कुलकर्णी घरीं परतले. आहेत. ते घाईघाईनं शीलाताईंना उठवायचा प्रयत्न करताहेत. दोघींच्या मदतीनें त्यांनीं शीलाताईंना बसतं केलं आहे. तिची धांप अद्याप कमी झालेली नाही. ताई तिचं पातळ झटकीत आहेत. पातळाच्या घोळांत लीला-ताईच्या ओझ्यानं चेंगरलेली पाल सांपडली आहे. यमुनाकाकू आणि ताई त्या घाणीकडं पाहून नाकं मुरडताहेत.

तो अजस्र देह खालीं कोलमडतांना पाहि-ल्यानं त्या दोघींनाहि हंसू अनावर झालं आहे. शीलाताई चडफडली आहे आणि कुलकर्ण्यांनी आपल्या अंगाला हात लावला. आधल्याला कवेंत घेऊन बसंत केलं म्हणून त्यांना शिव्या मोजतें आहे. ' माझ्यासारख्या नाजूक बाईला उचलायला तिघांचं काय काम होतं ?' म्हणून चडफडते आहे. कुलकर्ण्यांची आपणावर वाईट नजर आहे. तो माझ्यासाठीं जळतोय ! असं म्हणते आहे. ' लोचट ' 'कुत्रा' असल्या पदव्या बहाल करते आहे. जिन्याच्या एका पायरीवर बसून कपाळाला आलेल्या टेंगळावर हात फिरवीत ती बडबडते आहे. ती बरचसं बोलते आहे पण त्या सर्वांचा आशय मात्र 'मी नाजूक आहे !' असा आहे.

आणि यमुनाकाकू आणि ताई हंसताहेत. हंसतां हंसतां तोंड वेडवांकडं करीत काकू म्हणताहेत, ' मीऽऽ नाऽऽजूक आहे हं !' आणि तिघीहि पोट धरधरून हंसताहेत.



# वीर्यशुल्का

*'.. प्रेम-! हे गणिके, तुला माहित होतं कीं चन्द्रगुप्तानं खेळलेल्या नाटकापैकींच हें एक नाटक...तूं हवं तेवढं प्रेम कर. पण....*
*'तसा तिच्या नजरेंतल्या चिरडींचा स्फोट झाला. आणि....!'*

**इसवी** सनाच्या चौथ्या शतकांतला काल. ¦ गुप्तवंशाच्या भरभराटीचा, मगधाच्या भाग्योदयाचा अन् इतिहासांत सुवर्णयुग गणला जाणारा. गुप्तवंशीय सम्राट समुद्रगुप्त आपल्या पुत्रांवर रामगुप्त व चंद्रगुप्तावर राज्याचा भार टाकून नुकताच परलोकवासी झाला होता. आतां मगधाच्या राज्यशकटाचे कांसरे समुद्रगुप्ताचा ज्येष्ठ पुत्र रामगुप्त याच्या हातीं होते.

गंगा व शोण नद्यांच्या मनोहर संगमावरची एक संध्याकाळ. कांठावरच्या सोनेरी वाळवंटात गारवा रुजू लागलाय. मावळती सूर्य-किरणं पाटलीपुत्राभोवतालच्या लाकडी तटावरून वर वर सरकत माघार घेऊं लागलीत. तटाच्या पांचशें सत्तर बुरुजाचीं डोकीं त्या किरणांत न्हाताहेत आणि तिन्ही खंदकांतल्या पाण्याचा रंग काळसर होत चाललाय.

राजांतःपुरालगतचा एक संगमरवरी शुभ्र प्रासाद धूपगंधानं भरून गेलाय. सुवर्णमंचकावरच्या परशय्येवर एक तरुणी पहुडली आहे. धुंद, स्वप्निल पुष्पासारखी. दोन प्रहरीच्या मिष्टान्नांची गोडी अजून तिच्या ओष्ठद्वयांवर रेंगाळतेय. तेवते दीप हंसताहेत, हलकेच झुलताहेत. तिच्या कानांतल्या चमचमत्या कर्णफुलांनीं अन् गळ्यांतल्या निष्कमालेनं दीपांचं ते हंसणं टिपलं आहे, तितक्याच स्वरेनं काळ्याभोर केशपाशांतून डोकावणाऱ्या गोंडस मुखकमलांवर उधळून दिलंय. मस्तकाखालीं सरकवलेल्या केळीच्या खोडासारख्या नितळ बाहूंचें सौंदर्य रत्नजडीत अंगदानी अन् कंकणांनी द्विगुणित केलंय, पक्व आम्रफलांनी लाजावं असं उन्नत वक्षस्थल अन् त्याचा भार वाहतां वाहतां क्षीण झालेली कटी. पिकल्या तोंडल्यासारख्या ओष्ठपोंवळ्यांचा रक्तवर्ण अन् तळपायाच्या मेंदीचा केशरीवर्ण या दोहोंची स्पर्धा. छे, छे, शब्द तोकडे पडावेत वर्णन करतांना. असं हें सौंदर्य. पण विशाल नेत्रकमलांच्या पाकळ्या उमलून त्यांतल्या मासोळ्या सळसळूं लागल्याशिवाय ह्या सौंदर्याची सांगता होणार नव्हती, पूर्णत्व येणार नव्हतं. खरंच, त्या तरुणीनं, वीर्यशुल्केनं आतां उठायला हवं होतं. पण मिटल्या नेत्रांसमोर नाचणारा गतस्मृतीचा हर्षभरित चित्रपट बंद करण्याची तिची इच्छा नव्हती. तिला तो प्रसंग आठवत होता.

त्या दिवशीं ती पाटलिपुत्राच्या पण्यविथींत (बाजार पेठेंत) मौज पहात उभी होती. अंगावर संपूर्ण पुरुषवेष होता. त्या वेषांत ती एखाद्या नुकतीच मिसरूड फुटलेल्या कोंवळ्या तरुणासारखी दिसत होती. हातात एका पणास ( तांब्याचा पैसा ) खरीदलेली रसरशीत; टप्पोरी द्राक्षें होती. तोंड चालू होतं. पांढऱ्याशुभ्र मोगरीच्या कळ्या एकमेकांशीं झुळतांच तो माधुर्याचा ठेवा टचकन् फुटे. आंबटगोड रसाचा घुटका गटकन् घशांतून खालीं उतरे आणि मधूनच पोटाकडून गोड ढेकराची





अनुक्रमणिका

धावतां मिळे. पण अचानक त्या द्राक्षांवर टपलेला एक मलामोठा वानर दांत विचकीत तिच्यापुढें ठाकला अन् हा नकली पुरुष गडबडला. तिच्या सहाय्यार्थ धांवलेल्या एका साधासुध्या वेषांतल्या तरुणाला तिनें घाबरून मिठी मारली. झालें, त्या देखण्या तरुणाच्या विशाल छातीशीं तिच्या गोंडस वक्षस्थलानें चुगली केली. तिचं बिंग फुटलं, अगदीं अनपेक्षितरीत्या.

ती शरमली. इतकी शरमली कीं वानराच्या भीतीनें ती ज्या आवेगांत त्याला बिलगली त्याच्या दुप्पट प्रत्यावेगानं मागें सरकली. लज्जेचं जोखड मान वर उचलूं देईना. त्या तरुणाच्या चेहऱ्यावर बेडर हास्य खेळत होतं.

'तिथं, उद्यानांत बसूं या आपण.' त्यानं सुचवलं.

'अं हं...'

'कां...? माझी भीति वाटते...? वानर नाहीं मी...'

उत्तर देणं कठीण होतं. तिचीं पावलं नकळत वळलीं.

'पाटलिपुत्रांत नवीनच दिसतेस. कुठून आलीस...?'

'पद्मावतीहून.'

'पद्मावती? उत्तरेकडची...?'

'हूं'

'घरीं कोण आहे...? आईवडील...?'

'वारले. मी एकटीच. अगदीं एकटीच आल्यें इथं.' कां कोण जाणे, वीर्यशुल्केला त्या तरुणाविषयीं आपुलकी वाटूं लागली.

'मग इथं कां आलीस, कशी आलीस—' त्याचा आवाज जरासा चढला होता. तिनं मान वर उचलली, नजरेशीं नजर भिडवली आणि तिच्या स्वराला धार आली.

'कां येऊं नये इथं? परमभट्टारक (महाराज) समुद्रगुप्तानं नागसेनाचा—आमच्या राजाचा मुकुट मातींत मिळवला नसता, त्याचा पराभव केला नसता तर...तर मी इकडे आलेंहि नसतें—'

'म्हणजे...?'

'माझा पिता, एकुलतं एक छत्र त्या लढाईत, रणकुंडांत हरवलं. समुद्रगुप्तानं आपल्या दिग्विजयानं उत्तर-दक्षिण सारखीच रक्तांत माखवली. अश्वमेध केला अन् आपल्या कीर्तिकळसावर सुवर्णवर्खं चढवला...'

'आपल्या दुर्दैवाचं खापर परमभट्टारकांवर लादायचंय तुला? राजधानींत राजाविरुद्ध बोलणाऱ्याला कसलं शासन होतं माहीत आहे ना?'

'होय—' ती निर्भयपणें उद्गारली '—पण मला त्याची भीति वाटत नाहीं. समुद्रगुप्ताच्या स्वारीमुळेंच मी अशी उघडी पडले; देशोधडीला मिळालें. बाबा गेले आणि नागसेन महाराजहि. त्या चांडाळाला मोकळं रान मिळालं. बेवारशी माल पाहून त्याच्या तोंडाला पाणी सुटलं.—'

'कोण होता तो?'

'नागसेनाशीं द्रोह केलेला एक सेनापति होता तो. कायेवर फुललेली यौवनाची कलाकुसर त्याच्यांपासून लपविण्यासाठीं, जपण्यासाठीं मी पुरुषवेष घेतला. नंदन सार्थवाहांचा (व्यापाऱ्याचा) सार्थ इकडे येणार होता. त्याच्या हातापायां पडून सार्थांत सामील झालें आणि लपतछपत इथं आलें.—'

माझ्याशीं इतकं मोकळं बोलतांना तुला संकोच—'



जनार्दन मातव

अनुक्रमणिका







'ऐकून घेतलंत म्हणून हृदय मोकळं केलं.'

'असं ? अन् हे बोलणं भट्टारक रामगुप्ताच्या अगरं चंद्रगुप्ताच्या कानीं गेलं तर...?'

'तर काय, देतील ती शिक्षा भोगीन, पण सत्य--'

'मग ऐक तर, हा चंद्रगुप्त तुला आजन्म बंदिवासाची शिक्षा देत आहे.'

'चंद्रगुप्त ? आणि आजन्म बंदिवास-' तिची जीभ टाळूला चिकटली. डोळे विस्फारले.

'होय, चंद्रगुप्त. लिच्छविदौहित्र समुद्रगुप्ताचा कनिष्ठ पुत्र-' त्यानं तोंडावरच्या दाढीमिशा क्षणभर बाजूला केल्या. होय, तो चन्द्रगुप्तच होता. '-माझ्या या करशृंखलांत मी तुला कायमचं बंदिवान करून ठेवणार आहे...'

वीर्यशुल्केला पुन्हां आश्चर्याचा धक्का बसला.

'तुम्ही...तुम्ही मला...शिक्षा—'

'खुळे, भावनेच्या भरांत माणूस वाटेल तें बडबडतो. पिताभट्टारक वीर होते तसेच उदारहि होते. निव्वळ भूमीच्या लोभानं त्यांनीं युद्ध केलं नाहीं. भरतवर्षांत विखुरलेल्या गणांची, राज्यांची ताकद एक छत्राखालीं एकवटावी आणि तिचा उपयोग विदेशी आक्रमण थोपवण्यासाठीं व्हावा असाच त्यांचा हेतु होता...'

अशा चमत्कारिक योगायोगानं वीर्यशुल्का चंद्रगुप्ताच्या अंतःपुरांत आली, त्याच्या गळ्यांतला ताईत बनून राहिली. समाजांत तिच्यासाठीं मानाचं स्थान नव्हतं. इतकंच काय, पण तिला ओळखणारीं माणसंहि अगदीं थोडीं होतीं. वीर्यशुल्केला त्याचं दुःख नव्हतं. चन्द्रगुप्ताच्या बळकट बाहूंच्या मिठींत ती सुखी होती, स्वस्थ होती.

वीर्यशुल्केची निद्रा भंग पावली. दारावर टकटक ऐकूं येत होती कुणीतरी आलं होतं. वीर्यशुल्केला घाम फुटला. शंकाकुल मनाने तिनें दासींना हांका मारल्या--

'गुणलुब्धेऽऽये गुणलुब्धे...लवंगिकेऽऽ गेल्या तरी कुठं बाई या...?' महालाच्या भिंतीवर आदळून परत फिरलेल्या आवाजानं तिथं कोणीच नसल्याचं तिला सांगितलं. मग तिला आठवलं, अशोकारामांत तथागताच्या (बुद्धाच्या) अस्थींचं दर्शन घ्यायला गेलेल्या दासींना परतायला अद्याप पुष्कळच अवकाश होता. थरथरत्या वक्षांगावर उत्तरीय ओढीत ती दरवाज्याकडे वळली. आनितंब रुळणारा केशसंभार सारखा करीत तिनें दरवाजा उघडला आणि...दरवाजांतून आंत घुसलेल्या एका बळकट हातानें तिचं तोंड दाबून धरलं. आश्चर्योद्गार घशांतच गुदमरला. आंत घुसलेल्या तीन व्यक्तींपैकी एकानं दार लोटून घेतलं. त्यांचा वेष वीर्यशुल्केला अगदी अपरिचित होता. सर्वांग वस्त्रांनी लपेटलेलं आणि तोंडावरसुद्धां रुमाल.



'आर्ये, यत्किंचितहि ध्वनी करूं नकोस. तुला दुखापत केली जाणार नाहीं. मुकाट्यानं मंचकावर बसून रहा--' आवाजांतली ओळखीची झांक वीर्यशुल्केला गोंधळून टाकीत होती.

'पण...पण आपण कोण महाभागा...? आणि या अवेळीं इथं घुसण्याचं धाडस--'

'तें विशद करण्याची आवश्यकता नाहीं. त्यावांचूनहि आपण आम्हांला सहाय्य करूं शकाल.'

'तुम्ही कोणासमोर उभे आहांत याची—'

'होय, पूर्ण कल्पना आहे. चंद्रगुप्ताच्या आवडत्या पण रुपाजीवा (वेश्या) असलेल्या स्त्रीनं स्वसामर्थ्याविषयीं मोठमोठ्या कल्पना करूं नयेत.'

वीर्यशुल्का पांढरी फटफटीत पडली. तिची कोमल नासिका क्रोधानं थरथरूं लागली. पण संयमपूर्वक ती म्हणाली,

'कसली अपेक्षा करतां तुम्ही...?'

'सहकार्याची'

'सहकार्य ? कसलं ?' पळभर गूढ शांतता पसरली. त्या मुखवेष्टित व्यक्तींनं, बहुधा तो त्यांचा मुख्य असावा, अचानक विचारलं,

'हा...हा संगमरवरी महाल, हीं तलम वस्त्रं, हे रत्नसुवर्णांचे अलंकार, हे सुखविलास किती दिवस टिकतील असं वाटतं तुम्हांला ?'

'म्हणजे...मी नाही समजलें...?'

'मला म्हणायचं होतं, चंद्रगुप्ताचा हा वरदहस्त किती दिवस तुमच्यावर राहील ?...अं, किती दिवस...? जास्त काल खचितच नाहीं.'

'कशावरून...? रामगुप्ताच्या अंतःपुरांत कांहीं थोड्याथिडक्या स्त्रिया नाहींत...?'

'खरं आहे, थोड्याथिडक्या नाहींत—चांगल्या तीन-चारशें आहेत. भट्टारक रामगुप्त त्यांच्या वाटेला वर्षांतून एखादीच रात्र येत असेल; परंतु त्यांच्या सुखविलासाची जन्मजन्मांतरीची तरतूद आहे. तुमच्या बाबतींत हें शक्य नाहीं.'

'कां ?'

'भावाभावांतहि फरक असतो आर्यें. चंद्रगुप्ताला नित्य नवें फूल हुंगायला आवडतं, नुसतं हुंगायला. पण ते कायमचं जवळ बाळगायची त्याची इच्छा नसते. अत्यंत चंचल, उच्छृंखल वृत्तीचा माणूस आहे तो. उथळ पाणी आहे तें वीर्यशुल्के, मुठींत पकडायचा हव्यास करूं नकोस. कदाचित्...कदाचित् कांहीं कालानंतर राजवाड्यांतला केर काढणारी दासी; यापेक्षां तुझी किंमत...' वीर्यशुल्का उलटसुलट विचारांच्या गोंधळानं मूढ बनली होती. तिला त्या माणसाचं बोलणं पटत नव्हतं पण त्याला संयुक्तिक उत्तरहि देतां येत नव्हतं.

'आतांच सावध व्हा. वेळ अजून गेली नाहीं. फक्त आमच्या कार्यांत सहाय्य करा. तुमच्या आयुष्याची तरतूद–" वीर्यशुल्केच्या तोंडून नकळत शब्द निसटले.

'काय करावं मी...?' ती मुखवेष्टित व्यक्ति तिच्या कानाशीं लागून कांहींतरी पुटपुटली. सर्वांगावर आगीचा वर्षाव व्हावा तशी दचकून वीर्यशुल्का किंचाळली.

'काय. वध...?—'

'होय, वध. चन्द्रगुप्ताचा वध कीं जो प्रजेच्या दृष्टीनं अपघाती मरण असेल. मदिरेच्या अतिरेकी धुंदीत चन्द्रगुप्त या खिडकींतून खाली कोसळला असंच जग समजेल.'








डालडा
खजुरी छाप
वनस्पति




- डालडा अत्युत्कृष्ट वनस्पति तेलांपासून बनविलेलें असतें.
- त्यांत वाढत्या मुलांसाठीं आवश्यक तीं जीवनसत्त्वें घातलेलीं असतात.
- आरोग्यदृष्ट्या हस्तक्षेप-निरोधक अशा सीलबंद डब्यांतून तें मिळतें.
- ध्यानांत असूं द्या, कीं डालडा सुटें कधींच विकलें जात नाहीं.

स्वयंपाकासाठीं खास शुद्ध स्निग्ध पदार्थ

DL. 86-140 MA

हिंदुस्तान लीव्हरचें उत्पादन








' शक्य नाहीं... हें अघोरी कृत्य...केवढा दुष्टपणा—'

'हाऽ हाऽ हा , दुष्टपणा नव्हे शासन म्हणा. काय उपयोग आहे राजकारभारांत या माणसाचा...? वडील भाऊ गादीवर असेपर्यंत त्याला गादी मिळणं शक्य नाहीं. एकीकडून कुषाण राजा देवपुत्र शाही, एकीकडून महाक्षत्रप रुद्रदाम यांसारखे शत्रू तोंडाशीं येऊन ठेपले असतांना याची अंतर्गत कारस्थानं चालू आहेत. हीं अस्तनींतला साप केव्हां उलटेल तें सांगतां येणार नाहीं. प्रजाहितासाठीं त्याचा वध हाच एक मार्ग आहे... ' हातांत खुपसलेलं तोंड वीर्यशुल्केनं वर उचललं अन् ती निर्धारानं म्हणाली.

'माझ्या हातून हें कृत्य घडणार नाहीं. दीनारांनीं विकत घेतली जाणारी स्त्री नाहीं मी. मी जर हें चंद्रगुप्ताच्या कानावर घातलं तर— '

ती व्यक्ति पुन्हां एकदां ढगासारखा गडगडाट करीत हंसली.

' चंद्रगुप्ताला वर्दी दिली तरी आम्हीं कोण हें त्याला कदापिही समजणार नाहीं. उगाच मृत्यूला निमंत्रण देऊं नकोस. '

' मृत्यूला निमंत्रण...? '

' मृत्युला निमंत्रण कसं असतं, पहायचंय...? पहा तर–' बोलतां बोलतां त्या व्यक्तीच्या आवाजांत एकदम बदल झाला...

' चल मित्रा...बाहेर ये. आमच्या तरवारीची धार फार तिखट आहे...मुकाट्यानें बाहेर ये...' तो कुणाला उद्देशून बोलतोय हे वीर्यशुल्केच्या ध्यानांत येईना. त्या माणसाची तरवार तिच्या मंचकावरून जमिनीपर्यंत रुळणाऱ्या शालींतून आंत घुसली होती. क्षणभर गेला. अन् मग लोहानं चुंबकाला चिकटावं तसा तरवारीच्या टोकाला चिकटूनच एक माणूस हळूं हळूं बाहेर पडला. तो भीतीनं काळवंडला होता. वीर्यशुल्का दगडी पुतळ्यासारखी स्तब्ध झाली होती. क्षणार्धांत त्या घेरेयेणाऱ्या माणसाला निःशस्त्र करून त्याची गठडी वळण्यांत आली. इशाऱ्यासरशीं त्याला घेऊन बाकीचे दोघे निघून गेले.

' पाहिलंस, मृत्यूचं निमंत्रण...? ' वीर्यशुल्का दचकून मागे वळली.' त्या व्यक्तीनं मुखावरचं आच्छादन काढून टाकलं होतं. डोळ्यावर तिचा विश्वास बसेना. तिच्या पुढ्यांत चन्द्रगुप्त उभा होता. त्याच्या ओठांना एका बाजूस मुरड पडली होती. एक भुंवई धनुष्यासारखी ताणून वर उचलली गेली होती. अन् ती रोखलेली नजर, ती नजर तिचं काळीज शोधून काढीत होती. तिच्या नितळ कायेवर स्वेदाचीं कारंजीं पाझरलीं. असहायतेनें तिनं तोंड फिरवलं अन् चन्द्रगुप्त खो खो हंसत सुटला.

' चन्द्रगुप्त बोळ्यानं दूध पितोय असंच समजताहेत सारे. चन्द्रगुप्ताच्या बाहूंत रग आहे अन् हेरांत जाग आहे. माझ्या वधाचीं कारस्थानं करताहेत. भगवान कौटिल्याच्या राजनीतीचा थेंब न् थेंब पिऊन पचवलाय मी; तो असा मंडुकाच्या हातून मरायला ?...'

वीर्यशुल्केची बोबडी वळली होती. भीतीनं ती रडूं लागली.

' स्वामी...मी लपविलं नाहीं त्याला...तो...तो...कोण होता हें पण मला...'

' मला माहीतं आहे...माझ्या वधासाठीं लाभणारं पाषाणाचं काळीज नाहीं तुझ्याजवळ. मला मारायला तो इथं टपून बसला होता... अरे ! पण तूं रडतेस कां ? मी तुझा त्याग करीन म्हणून ? खुळी कुठली, तें सारं नाटक होतं, सारं नाटक !' वीर्यशुल्केच्या उरावरचं ओझं हटलं होतं पण तिच्या डोळ्यावाटें अश्रुधारा ओघळतच होत्या. तें पाहून चंद्रगुप्त उद्गारला.

' प्रिये, तुला विश्वास नाहीं वाटत ? काय हवंय तुला ? चंद्रगुप्ताचं राज्ञीपद ?–' वीर्यशुल्केनें भरल्या नेत्रांनीं त्याच्याकडं अतीव करुण दृष्टिक्षेप केला,–'मग, मग हे दुःखाश्रू ?'

' स्वामी, दुःखाश्रू नाहीत हे. खाल्लेलं मीठ माझ्या अश्रूवाटे पाझरतंय. त्या अश्रूंना छिद्रं पाडून गळ्यांत धारण करण्याचा प्रयत्न करूं नका. निर्जीव मोत्यें नाहींत तीं. ते तुमच्या पायांवर पडूं द्या. तुमच्या पायधुळीला माझ्या प्रेमाचा सुगंध येऊं द्या. मला तुमचं सिंहासन नकोय, पट्टराणीपद नकोय. हवंय फक्त हृदय. तें कायमचं मिळावं हीच प्रार्थना–' वीर्यशुल्का एक प्रकारच्या धुंदींत बोलत होती अन् स्मितवदन चन्द्रगुप्त ऐकत होता, शांत होऊन वीर्यशुल्केचा मृदुमृदुल कचपाश कुरवाळीत होता.

' वीर्यशुल्के, किती काव्यमय बोलतेस तूं ? रुणझुणत्या वाऱ्याचं संगीत, जलौघाचा मंद गंभीर खळखळाट अन् राजहंसाच्या कलकलाटातलं माधुर्य तुझ्या कंठांत एकवटलं आहे. पण माझ्या कोमल फुला,–' त्याचा स्वर आश्चर्यकारकरित्या बदलत चालला. ' राजकारणांत पडायचं तुला कारण नाहीं. हें सर्व तू विसरून जा. घडलंच नाहीं असं समज. तुझं क्षेत्र नव्हे तें '

वीर्यशुल्केला एक उत्कट चुंबन देऊन तो निर्भय सिंह निघून गेला.

तो निघून गेला, त्या प्रसंगाचा धगधगीत ठसा उमटवून. वीर्य-शुल्केला नवाच हृद्रोग लावून. दिवस सरतां सरेनात. रात्री खायलां उठत. त्या प्रसंगानंतर चन्द्रगुप्त तिच्या महालाकडे अजिबात फिरकला नाहीं. सैतान वीर्यशुल्केच्या रिकाम्या मनांत धुडगूस घालूं लागला.

पहांटेपर्यंत उशी आंसवांनीं चिंब होई. वेणींतून गळालेलं एखादं सुकलेलं फूल तिथं मरगळून पडलेलं असे. बघतां बघतां तें फूल खदखदून हंसे. त्या विषादभरल्या हास्याच्या बुरख्यांतून शब्द उमटत, 'वीर्यशुल्के, चंद्रगुप्ताला नित्य नवं फूल हुंगायला आवडतं... नित्य नवं... सुकलेलं, कोमेजलेलं नव्हे...' विचाराचं जळमट झटकूं पहात. वीर्यशुल्का तिरीमिरीसरशीं अंथरुणाबाहेर पडे, जलपात्रांतून पाण्याची धार हातावर घेई. पण ओंजळ करण्याऐवजी बोटें तशीच वासलेलीं रहात. पाणी बोटांमधून खळखळत निघून जाई. तो कुत्सित खळखळाट तिला हिणवी. 'उथळ पाणी आहे वीर्यशुल्के, मुठींत पकडायचा प्रयत्न करूं नकोस. अत्यन्त चंचल, उच्छृंखल...' कानावर हात ठेवीत ती नजर वळवी. कुठेंतरी कोंपऱ्यांत स्थिर करी. तिथं नाक मुरडून उताणी पडलेली एखादी केरसुणी दृष्टीस पडे. तिच्या टोंकदार काड्यांतून बोचरे शब्द आकारत, 'वीर्यशुल्के, एक दिवस राजवाड्यांत केर काढणारी दासी यापेक्षां तुझी किंमत...' वीर्यशुल्केचा असह्य कोंडमारा होई. भविष्यकालाची अंधारी गर्ता डोळ्यांसमोर उभी राही. बावरलेलं तिचं मन बळेंबळेंच केसांवर हात फिरवणाऱ्या चंद्रगुप्ताची स्निग्धमूर्ति नजरेसमोर आणी. शब्द वदवून घेई त्या मूर्तीच्या तोंडून—'खुळे... तें सारं नाटक होतं, सारं नाटक... तुला अंतर देणार नाहीं मी...' हळूंहळूं तिचं मन थाऱ्यावर येई. चंद्र-गुप्ताबद्दल विश्वास उत्पन्न होई. मग प्रेम, माया. पण त्या मायेच्या हिरवळींतूनच बघतां बघतां चिंतेचा कोंब उभा राही. त्याला भीतीचीं पानें फुटत. माझ्या चंद्रावर मारेकरी टपलेत... चंद्रगुप्ताचा वध... अन् पुन्हां त्याच्या अवगुणांची भुतावळ तिच्याभोंवती पिंगा घालूं लागे. पुन्हां अविश्वास. पुन्हां कोंडमारा. विचारचक्रांत ती घुसमटूं लागे. असे दिवस ढकलत होते, चंद्रगुप्ताच्या मीलनाची आंस वाढवित. अशा रात्री घरंगळत होत्या, विरहाची आंच वाढवित.

आज प्रवरणा (अश्विनी पौर्णिमा) होती. वीर्यशुल्का खिडकी-जवळ उभी होती. दासीनं, गुणलुब्धेनं ती बातमी तिच्या कानावर घातली होती. थोड्याच वेळानं राजा रामगुप्त आपली राणी ध्रुवदेवी आणि बंधु चंद्रगुप्तासह त्या रस्त्यानं मिरवत जाणार होता. नगरवेशी-जवळ बांधलेल्या एका भव्य देवालयांत विष्णुदेवाच्या मूर्तीची स्थापना त्याच्या हस्तें होणार होती. म्हणूनच वीर्यशुल्का त्या खिडकीजवळ उभी होती. चंद्रगुप्ताची सुखरूपता पहायला डोळे आसुसलेले होते.

मिरवणूक यायला अजून अवधि होता. रस्त्याच्या दुतर्फा राज-दर्शनासाठीं प्रजाजनांची दाटी झाली होती. राज्याच्या स्वागतासाठीं सर्वजण उत्सुक होते. परड्यांतलीं पुष्पं, तबकांतलीं निरांजनं, मुठींतला गुलाल, हातांतले हार अस्वस्थ होते, वाट पहात होते. वीर्यशुल्का आपल्यांच विचारांत गर्क होती. दुरवरून 'जेदु जेद भट्टारक'चा पुकारा ऐकूं येतांच शुद्धीवर येत तिनं मान उंचावली. क्षणभर तिची नजर बाजूच्या मंदिरावर खिळली अन् ती एकदम दचकली. आकाशांत उंचच उंच घुसलेल्या त्या मंदिराच्या शिखरावर अधून मधून छोटे छोटे कोनाडे कोरलेले होते. त्या कोनाड्यामध्यें देवादिकांच्या निर-निराळ्या अवस्थेंतील तीनचार फूट उंचीच्या मूर्ति बसविलेल्या होत्या आणि अशाच एका मूर्तीला चिकटून ऐक मनुष्य बसला होता. त्याचा श्यामल वर्ण तो आर्य नाहीं हें स्पष्ट करीत होता. तशा अवस्थेंत बसणं-सुद्धां त्याला अवघड वाटत होतं हें वीर्यशुल्केच्या ध्यानांत आलं. जरा आजूबाजूला सरकला... हात निसटला तर...? त्या माणसाचं काय होईल...? कल्पनासुद्धां करवेना... पण त्यानं अशा अवघड जागीं बसावंच कां?... जवळ जवळ चाळीस फूट उंचीवर...? मिरवणूकच पहायची तर दुसरी जागा कां नव्हती...? रस्त्यावरून त्या माणसाकडे कुणाचंच लक्ष जाण्यासारखं नव्हतं. मग त्यानं जीवावर एवढं उदार कां व्हावं? वीर्यशुल्केला काहींच उमज पडेना. असेल कुणीतरी वेडा पीर अशी मनाची समजूत करीत तिनें मिरवणुकीकडे लक्ष वळवलं. पावलापावलांनीं मिरवणूक पुढें सरकत होती.

उधळलेलीं फुलं गुलालाच्या धुरांत लाल होऊनच खालीं पडत होती. जयकाराचे घोष घुमत होते. वाद्यं वाजत होतीं. अन् सारं वाता-वरण धुंद झालं होतं. मिरवणुकीच्या मध्यभागीं डुलत डुलत येणारे, भल्या मोठ्या पहाडासारखे दोन तीन गजराज वीर्यशुल्केच्या दृष्टिपथांत येऊं लागले. पहिल्या हत्तीवरच्या सुवर्णाच्या अंबारींत रामगुप्त राणी ध्रुवदेवीसह प्रजेच्या अभिवादनाचा हास्यमुद्रेनं स्वीकार करीत होता. दुसऱ्या अंबारींत होता तरणाबांड चन्द्रगुप्त. त्याच्या चेहऱ्यावर हंसूं होतं. पुष्पांचा त्या शृंगारलेल्या अंबाऱ्यांत नुसता खच पडत होता. क्षणभरासाठीं वीर्यशुल्केनें आपली नजर बाजूला वळवली.

ती पुन्हां चमकली...हें काय! त्या माणसाच्या हातांत पुष्पां-ऐवजीं सुरा लखलखत होता. तो मिरवणुकींतले हत्ती जणूं टप्प्यांत यायची वाट पहात होता. वीर्यशुल्का क्षणभर गोंधळली. काय करावं तें तिला सुचेना. मनांत घुसलेल्या एका विलक्षण कल्पनेनें तिला झटकन् आंत वळवलं. परत आली तेव्हां तिच्या हातांत एक दर्पण होता. तिचं रूपडं दररोज न्याहाळणारा आरसा. मिरवणुकींतले हत्ती मंदिराजवळ पोहोंचले होते. क्षणाचीहि उसंत नव्हती. पाऊल अन् पाऊल मोजलं जात होतं. तिनं अंगावर येणारे सूर्यकिरण आरशावर घेतले. किरण साधला. परावर्तित किरणांचा प्रखर प्रकाशझोत त्या माणसाच्या चेहऱ्यावर स्थिरावला. एका हातीं सुरा, दुसरा हात खांबाशीं. तो गडबडला, क्षणभर आंधळा झाला. तो प्रकाश, सूर्यशक्तीचा चकचकाट सहन होईना त्याला. अनवधानानें दोन्ही हात एकदम डोळ्यांकडे वळले. अन्...अन् आधार सुटला. एखाद्या पक्ष्यासारखा फडफडत धडपडत तो वेगानें जमिनीकडे कोसळला. अवकाश छेदित भयप्रद किंकाळी उमटली.

मिरवणुकींत हलकल्लोळ उठून ती जागीच थांबली. वीर्यशुल्केनं दर्पण बाजूला करीत डोळे मिटले. धडधडत्या उरानं पुन्हां उघडले. अंबारींतून कठोरगर्भ चंद्रगुप्ताच्या तीक्ष्ण नजरेनं सारं कांहीं टिपलं होतं. आपल्याकडे पाहून त्याच्या प्रस्फुरित ओठांनीं मंद स्मित केल्याचा भास वीर्यशुल्केला झाला. पण क्षणभरच. दुसऱ्या क्षणीं त्याची नजर समोरच्या अंबारींतल्या रामगुप्तावर खिळली होती. घसरलेलं उत्तरीय डाव्या स्कंधावर टाकीत बावरल्या मुद्रेनें तो त्या पडलेल्या माणसाबद्दल चौकशी करीत होता. अन् भेदक नजरेनें, चकार शब्द न उच्चारतां चंद्रगुप्त त्याच्या चेहऱ्याचं अवलोकन करीत होता. हत्तीजवळ

अश्वारूढ असलेला अमात्य राजाला सांगत होता, 'छोटासा अपघात झाला महाराज...मिरवणूक पहायला आला होता. अचानक हात सुटला आणि खालीं पडला...बेशुद्ध आहे' 'उपचारासाठीं रुग्णशालेंत न्या तात्रडतोब...' 'अं...हं. नेलंय पण. उपयोग होईलसं दिसत नाहीं. मरणाच्या पंथाला लागलाय...' 'हूं...' रामगुप्तानं विषादपूर्ण हुंकार दिला. अन् मिरवणूक हळूंहळू पुढं सरकूं लागली. चन्द्रगुप्तानं पुन्हां आपल्याकडे पाहून स्मित केल्याचा भास वीर्यशुल्केला झाला. तिनं सुटकेचा दीर्घ निःश्वास टाकला. तिनें चन्द्रगुप्ताचे पुन्हां प्राण वांचवले होते.

असेच दिवस चालले होते. पश्चिम सीमेवर देवपुत्र शाहीनं त्याच्या पारसिक धन्याच्या आज्ञेप्रमाणें जोर केला होता. त्याच्या अफाट सैन्यसागरानं रामगुप्ताच्या साम्राज्याचे लचके तोडायला सुरुवात केली. दुसऱ्या सीमांवर क्षत्रप आणि वाकाटक हे शत्रू संधी साधूं पहात होते. उशिरा जागा झालेला रामगुप्त त्याचं पारिपत्य करायला तिकडे गेला. पण तशाहि परिस्थितींत राणी ध्रुवदेवी व आपल्या अंतःपुराला तिकडे नेण्यास विसरला नाहीं. एका ओझरत्या भेटींत वीर्यशुल्केनं चन्द्रगुप्तापाशीं आघाडीवर येण्याची इच्छा व्यक्त केली. प्रथम स्पष्ट नकार मिळाला. पण बऱ्याच विनवण्यानंतर त्यानं तिला परवानगी दिली. थोड्याच दिवसांत चन्द्रगुप्ताबरोबर तीहि पश्चिम सीमेवर जाऊन टेपली.

एका सायंकाळीं वीर्यशुल्केच्या. तंबूंत घाईघाईनं प्रवेशलेली लवंगिका घाबरलेली होती. झंझावातानं कर्दळ गदगदावी तशी थरथरत होती.

'आर्ये, सर्वनाश झाला...सर्वनाश...'

'अग पण झालं तरी काय...?

'देवपुत्रानं हाहाःकार मांडलाय. चहूंबाजूनें वेढा पडलाय. सर्पाच्या वेटोळ्यांत कोंडलेंय आपण...

'आणि आपलें सैन्य...?'

'पळतंय नुसतं मेंढरासारखं...नुसती बाजारबुणग्यांची भरती... अमात्य आणि बलाधिकृतांच्या ( सेनापति ) निर्बुद्ध धोरणांचा हा परिणाम...त्यांतून आमचे कोमल महाराज रामगुप्त...शत्रूच्या रक्तांत न्हाण्यापेक्षां रक्तवर्ण सुरेचं स्नान यांना जास्त पसंत. राजा विलासांत दंग. मग प्रेजनं काय करायचं...? त्या मेल्या देवपुत्राचा सारा डोळा ध्रुवदेवीवरच आहे. शिष्टाईसाठीं दूत आलाय त्याचा. उद्यां सूर्यास्तापर्यंत महादेवी ध्रुवदेवी त्याच्या छावणींत पोहोंचली नाहीं तर...'

'नाहीं तर काय...?'

'पाटलिपुत्रांत रक्ताचे पाट वहातील आर्ये! मुंडक्यांचे मनोरे उभे रहातील...'

'अग बाई! मग आतां कसं ग!...परमभट्टारक काय म्हणताहेत?'

'काय म्हणताहेत?...वाचा भ्रष्ट झालीय त्या नादान राजाची... ध्रुवदेवीला त्याच्याकडे पाठवायला तयार झालेत ते—'

'लवंगिके! काय बरळते आहेस तूं?—' वीर्यशुल्केला जबरदस्त धक्का बसला होता. शत्रूला घाबरून हा नामर्द अन् विलासी राजा प्रत्यक्ष पत्नी विकायला तयार झाला होता. फुलासारखी कोमल ध्रुवदेवी. गुप्तवंशाची राजलक्ष्मी देवपुत्राच्या शेजेवरच्या शालीची अन् तिची एकच किंमत? त्या राक्षसाच्या वासनांमध्यें जळून खाक होणारी आहुति एवढंच महत्त्व?

'पण लवंगिके, त्याला जरासुद्धां...जरासुद्धां लाज वाटली नाहीं असं बोलतांना...?'

'लाज? लाज कसली...उलट भट्टारक म्हणत होते कीं हजारों माणसांचे जीव बचावत असतील तर मी एका स्त्रीची हांव कां बाळगावी?'

'नीचाला आतांशी प्रजा आठवली काय? प्रजेच्या शरीरावरच्या घावांऐवजीं स्वतःच्या गादीवरच्या सुरकुत्या मोजणारा हा राजा.'

तिचं बोलणं मध्येंच अडकलं. कुणाची तरी चाहूल लागली. चंद्रगुप्त घाईघाईनें आंत आला. त्याच्या मुद्रेवर दृढनिश्चयी गांभीर्य पसरलं होतं. त्याच्या नुसत्या दृष्टिक्षेपानेच लवंगिका बावरली अन् चटकन् निघून गेली.

'मला तुझं साह्य हवं आहे वीर्यशुल्के.'

'आज्ञा करावी स्वामी.'

'सांगेन तेवढंच करायचं. मला माहीत आहे रंगभूषेंत तुझा हात कोणी धरूं शकणार नाहीं. कां म्हणून विचारायचं नाहीं, कुणाजवळ बोलायचं नाहीं. इथून पुढं तुझ्या तोंडांतून बाहेर पडणाऱ्या प्रत्येक शब्दावर चंद्रगुप्ताचा अधिकार राहील. समजलं! चल आंत.' आणि तीं दोघें आंतल्या दालनांत गेलीं.

दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं इतर पांचशें शिबिकांसह भट्टारीका ध्रुवदेवीची शिबिका ( पालखी ) देवपुत्राच्या युद्धछावणीची वाट चालत होती. शिबिकावाहक गप्प होते. दुःखाच्या ओझ्यानें मुद्रा श्रमल्या होत्या. अंधार पडला. मशालींच्या उजेडांत शिबिका देवपुत्र शाहीच्या छावणींतील तंबूजवळ आल्या. एकच खळबळ उडाली. देवपुत्राला वर्दी गेली अन् त्याचीं उत्सुक, अधीर पावलं ध्रुवदेवीच्या स्वागतार्थ दाराशीं धांवलीं. त्यानं आतांपर्यंत ध्रुवदेवीला कधींच पाहिलं नव्हतं पण तिच्या सौंदर्याची ख्याति ऐकायला त्याच्या कानांचे पडदे सोकावले होते. तो खुष होता, स्वतःच्याच पराक्रमावर. ध्रुवदेवीचा आस्वाद घ्यायला आतुरला होता.

थरथरत्या हातानं पहिल्या शिबिकेचा पडदा त्यानं दूर केला. मशालींच्या उजेडांत आंतलं अनुपम सौंदर्य पाहून त्याचं हृदय उड्या मारायला लागलं.

'तूं...ध्रुवदेवी?'

'ही ध्रुवदेवी नव्हे महाराज...दुसरीच कुणी—' त्याच्या बाजूनें एक चिरका आवाज उमटला.

'मी...मी वीर्यशुल्का. ध्रुवदेवीची प्रतिहारी...' नकळत देवपुत्राच्या तोंडून केवलप्रयोगी अव्यय निसटलं.

'होय...! ज्या अप्सरेच्या प्रतिहारी इतक्या सुंदर मग ती स्वतः?'

नंतरच्या दुसऱ्या शिबिकेंतून उतरलं ध्रुवदेवी नामक अवगुंठित सौंदर्य. देवपुत्राची अधाशी नजर त्या झिरझिरीत वस्त्रांना चिकटली होती, छिद्रांछिद्रांतून आंत घुसूं पहात होती. भारल्या स्थितींत बाहुलं बनून त्या वस्त्रांमागोमाग देवपुत्र आपल्या तंबूंत आला. त्या वस्त्रांची सळसळ देवपुत्राच्या हृदयावर मोरपीस फिरवित होती.

त्या भव्य तंबूंत जीवघेणी शांतता पसरली. देवपुत्राच्या तोंडून आर्त हांक उमटली, 'ध्रुवदेवी, माझ्या जीवा...'

ध्रुवदेवी तशीच बसून राहिली. पाठमोरी पाषाणमूर्ति. देवपुत्र हलकेंच पुढें सरकला.






अनुक्रमणिका

' अवज्ञेची क्षमा असावी महाराज–' मद्यचषक पुढें करून प्रति- हारीच्या वेषांतली वीर्यशुल्का वेत्रासारखी लवली होती. कृतककोपानं देवपुत्र तिच्याकडं पहात राहिला. तितक्यांत ध्रुवदेवीच्या कांकणभरल्या हातांतला मद्यचषक त्याच्या अर्धमिटल्या ओठीं लागला. एक...दोन तीन, देवपुत्र खुष होऊन पीत होता. त्याच्या नकळतच वीर्यशुल्केच्या थरथरत्या हातून कसलीशी पूड एका चषकांत रिती झाली. देवपुत्र झिंगू लागला. बुबुळं वर चढूं लागलीं. पुडीनं काम केलं होतं.

ध्रुवदेवीचं मुखवस्त्र दूर करण्याच्या प्रयत्नांत तो तिच्या अंगावरच कोसळला आणि... क्षणार्धात त्याचं तोंड ध्रुवदेवीच्या ' बळकट ' हातांनीं दाबलं गेलं होतं. काय घडतंय हें समजण्याच्या आंतच ध्रुवदेवीच्या उजव्या हातांतली सुरी देवपुत्राच्या पोटांत घुसली होती. ' कड्कड्कट ', असा अस्पष्टसा आवाज. नंतरची अस्फूट किंचाळी. त्याच्या गरगरीत पोटावरील केसाळ जंगलात रक्त- लाव्हेचा लोट उसळला. घुसमटल्या तोंडानं देवपुत्राचा धिप्पाड देह धरणीवर आला. ती तडफड. किंकाळ्यांचा दाबला जाणारा प्रचंड उद्रेक. वीर्यशुल्केनें मान फिरवली. मरतां मरतां देवपुत्राला मात्र कळून चुकलं. जिला आपण ध्रुवदेवी समजलों तो भट्टारक चंद्रगुप्त होता.

देवपुत्राच्या निश्चेष्ट पडलेल्या कलेवराला चंद्रगुप्तानं तिरस्कारपूर्ण लत्ताप्रहार केला. अन् मग त्वरेनें तो पुढील व्यवस्थेस लागला. देवपुत्राचं मढं मंचकावर झांकून टाकल्यावर त्यानं आपला स्त्रीवेष उतरला. पुन्हां नित्याचा वेष धारण केला. भेदरलेल्या वीर्यशुल्केचा हात ओढून तो एकुलत्या एक दीपावर फुंकर घालीत, दबत दबत तंबूच्या दाराशीं गेला. हळूंच बाहेर डोकावला. सारं कांहीं व्यवस्थित होतं. आंतल्या प्रकाराबद्दल बाहेर कसलीच कल्पना नव्हती. शिबिका होत्या अन् शिबिकावाहकहि तिथंच होते. देवपुत्राचे सैनिक, पहारेकरी कुतूहलानें त्या शिबिकांभोंवतीं घोटाळत होते.

मागें वळून तो तंबूच्या मागील द्वारांतून हलकेंच बाहेर आला. एका हातांत वीर्यसाधक तरवार अन् दुसऱ्या हातीं वीर्यपूजक वीर्यशुल्का. त्या दोन असामान्य स्त्रीकारांची जोडी दो करांत वागवीत तंबूतंबूच्या अंधाऱ्या कनातीखालून तो मार्ग काढीत होता.

छावणीच्या सीमेबाहेरचा खुणेचा वृक्ष सांपडला अन् त्याखालचा फुरफुरता अश्वहि. कापसाचा ढीग उचलावा अशा हळूवारतेनं चंद्रगुप्तानं वीर्यशुल्केला उचलून घोड्यावर बसवलं. शंकेच्या अभ्रात गुरफटलेला उद्गार वीर्यशुल्केच्या तोंडून बाहेर आला.

' स्वामी...?' उत्तर मिळालं नाहीं. वीर्यशुल्केचं मस्तक थोडंसं खालीं झुकलं. ओठाला ओठ मिळाले. दोन क्षण विस्मृतींत डुंबले. अमृतांत हरवले.

भानावर येऊन चंद्रगुप्तानं घोड्याच्या पुठ्यांत तरवार टोंचली. तो अश्व वाऱ्यावर बेभान उधळला. वीर्यशुल्का आयाळीला चिकटली.

अन् मागें वळलेल्या चंद्रगुप्तांत रणमद संचारला. शिबिकामधून पांचशें वीर स्त्रीवेष फेंकून बाहेर आले. एकच हातघाई सुरू झाली. नेता नसलेल्या सेनेंतला दम चंद्रगुप्तानें जोखला होता. फुंकरीनं लाह्या उडाव्या तशी दोन घटकांतच देवपुत्राच्या सेनेची दाणादाण उडाली. चंद्रगुप्तांत भिनलेल्या चाणक्यनीतीचा डाव यशस्वी झाला होता. आतां विजयोन्मादानें धुंद झालेल्या चंद्रगुप्ताचा घोडा राम-

पान ३१ वर

कलाकृतींच्या जन्मकथा :



# मृतात्म्यास भेटणारा कलावंत

**सुमारें** शंभर वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. लंडनमधल्या फाउंटन कोर्ट भागां- तील विल्यमब्लेकेच्या स्टुडिओंत त्या दिवशीं रात्रभर दिवा जळत होता. लंडन शहर झोंपी गेलें. होतें तरी चित्रकार ब्लेके जागा होता. तो एका व्यक्तीची वाट पहात होता. आज कैक दिवस उत्कंठेनें वाट पाहूनहि ती त्याला भेटली नव्हती. त्याची मनःस्थिती अस्वस्थ झाली होती. पण त्याबरोबरच त्याला खात्री होती कीं ती व्यक्ति आज त्याच्या स्टुडिओंत आल्याशिवाय रहाणार नाही. ही व्यक्ति लंडन शहरांत रहात नव्हती. एवढेंच नव्हे तर या भूतलावरही तिचें वास्तव्य नव्हतें. पांचशें वर्षांपूर्वी मृत झालेली ती एक दिवंगत व्यक्ति होती! त्या दिवंगत व्यक्तीचें नांव होतें डान्टे! आपल्या काव्यगुणानें जगाच्या इतिहासांत अमर झालेल्या डान्टेची वाट पहात चित्रकार ब्लेके आपल्या स्टुडिओंत येरझारा घालीत होता.

या डान्टेचा ' डिव्हाईन कॉमेडी ' या सुंदर काव्यखंडाचें चित्रि- करण करण्याची कामगिरी ब्लेकेनें स्वीकारली होती. डान्टेनें या काव्यांत स्वतःचा परलोकप्रवास वर्णिला असून स्वर्गांत त्याची प्रेयसी बिॲट्रिस त्याला भेटल्याचा प्रसंग त्यानें वर्णन केला आहे. याच भेटीचें चित्र ब्लेकेनें प्रथम रेखाटायला घेतलें होतें. पण हा प्रसंग रेखाटणें वाटलें तितकें सोपें नव्हतें–कारण तो डान्टे त्यानें कधीं पाहिला नव्हता. डान्टेची प्रेयसी बिॲट्रिस त्याला कधीं दिसली नव्हती. आणि ज्या रथांतून ती डान्टेशी बोलली त्या स्वर्गीय रथाचें दर्शनही त्याला कधीं घडलें नव्हतें–हे सारें प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय तो त्यांचें चित्र कसें काढूं शकणार होता!

ब्लेके याचसाठींच आज अस्वस्थ झाला होता. डान्टेच्या भेटीसाठीं आतुरला होता. डान्टेच्या कवनांतल्या ओळी त्याच्या मुखावर नाचत होत्या. आणि पहाता पहाता आश्चर्य घडलें. एक प्रखर प्रकाशझोत ब्लेकेला दिसूं लागला आणि ज्या डान्टेची तो वाट पहात होता तो डान्टे त्याच्यापुढें उभा राहिला. तो महाकवि स्निग्ध स्वरांत म्हणाला, ' चल, तुला माझी प्रेयसी बिॲट्रिस दाखवतो आणि तिचा अद्वितीय रथहि दाखवतो. '

**ब्लेकेनें तें सारें दृश्य डोळे भरून पाहिलें. तो डान्टेला म्हणाला, ' डान्टे, क्षणभर तूं हा असाच रहा. बिॲट्रिसला अशीच रथांत उभी**









रहायला सांग. मला तुमची स्केचेस करून घेऊ द्या.' ब्लेकेनें कागद पेन्सिल घेऊन कितीतरी छोटी छोटी स्केचेस केली. ती अद्‌भूत दुनिया क्षणांत लुप्त झाली. पण ब्लेकेजवळ आता ती स्केचेस होती. त्या स्केचेसच्या आधारानें या लेखासोबत दिलेलें चित्र दुसऱ्या दिवशी ब्लेकेनें तयार केलें.

अशा रीतीनें कैकतरी मृतात्म्यांना ब्लेकेनें आजपर्यंत पाहिलें होतें! कैक मृतात्म्यांशी त्यानें गप्पा मारल्या होत्या! कैक मृतात्म्यांबरोबर त्यानें जेवण केलें होतें! ब्लेकेला चित्रकलेप्रमाणेंच काव्याचेहि वेड होतें. इंग्लिश वाङ्मयांतील ब्लेकेची काव्यसंपदाही त्याच्या चित्रकलेइतकीच उल्लेखनीय ठरली आहे. पण या काव्याच्या बाबतींतही तो हाच अनुभव सांगतो. तो म्हणतो, 'माझ्या काव्याच्या बाबतींत खरें पाहिलें तर माझी अवस्था एखाद्या कारकुनासारखी आहे. मिल्टनसारखे जगद्वंद्य कवी माझ्या टेबलाशीं येतात आणि मला सक्तीनें हें काव्य लिहायला लावतात. त्यांनीं सांगावें आणि मी लिहावें अशी माझी खरी अवस्था आहे. कैकदां मी कंटाळलेला असतो तरीही ते मला जुलमानें हें लेखन करायला लावतात. कैकदा तर ते इतकी घाई करतात कीं मला लिहून घेतां घेतां पुरेवाट होते. पण काय करूं! या दिवंगत व्यक्तींचा माझ्यावर इतका पगडा आहे कीं त्यांचा मी अगदीं गुलाम बनलो आहे.'

ब्लेकेला या दिवंगत व्यक्ति भेटत असत यावर त्याच्या मित्रमंडळींचा विश्वास होता. रॉडीन त्याच्या चित्रांतील दिवंगत व्यक्तींबद्दल म्हणतो कीं, 'या व्यक्ति ब्लेकेनें एकदां नव्हे तर चारदां पाहिल्या होत्या.' दिवंगत व्यक्तींच्या या अद्‌भुत भेटींसंबंधी ब्लेकेच्या दोन मित्रांचा प्रत्यक्ष अनुभव कनिंगहॅमनें लिहून ठेवला आहे. व्हारले आणि लिनले या दोन मित्रांनी ब्लेकेला एकदां विल्यम वॉलेसचें चित्र काढण्याची विनंती केली. ब्लेके क्षणभर स्थिर झाला. त्याच्या नेत्रांत एक विलक्षण चमक दिसूं लागली. त्याचा चेहरा गोरामोरा झाला आणि मग घोगऱ्या स्वरांत तो उद्‌गारला, 'तुम्हाला विल्यम वॉलेसचें चित्र हवें आहे ना? तो बघा वॉलेस आला. थांबा. त्याचें चित्र मी काढून घेतो.' त्यानें चटकन्‌ कागद पेन्सिल घेतली आणि भराभरा तो वॉलेसची चेहरेपट्टी रेखाटूं लागला. त्या दोघांना वॉलेस दिसत नव्हता, पण ब्लेके अशा तन्हेनें तें चित्र काढीत होता कीं जणूं साक्षात्‌ वॉलेसच त्याच्या डोळ्यांपुढं उभा होता. पण जरा वेळानें ब्लेके मध्येंच थांबला आणि त्या दोघा मित्रांना म्हणाला, 'बघा कसा अडथळा निर्माण झाला. वॉलेसच्या आणि माझ्या मध्यें आतां पहिला एडवर्ड येऊन उभा राहिला आहे. आता या राजेसाहेबांना बाजूला व्हा कोण म्हणणार?' यावर ब्लेकेचे ते दोघे मित्र म्हणाले, 'अरे, मग हे छानच झालें. पहिल्या एडवर्डचेंहि चित्र काढून घे.' ब्लेकेनी दुसरा कागद घेतला आणि पहिल्या एडवर्डचें चित्र काढून घेतलें. जरावेळानें राजेसाहेब निघून गेले आणि मग वॉलेसचें चित्र ब्लेकेनें पुरें केलें.'

ब्लेकेला परलोकांतले आत्मे भेटतात ही गोष्ट साऱ्या युरोपभर पसरली होती. कांहींना वाटे हा सारा खुळेपणाचा प्रकार असावा. काही म्हणत ही एक बुवाबाजीची तऱ्हा आहे. पण ब्लेके खुळाही नव्हता अगर भोंदूही नव्हता हे त्याच्या विषयीं त्याच्या मित्रांनी काढलेल्या उद्‌गारावरून दिसून येते. सॅम्युअल पालमेर त्याच्याविषयीं लिहितो, 'हा ध्येयवादी महापुरुष पोटार्थी नव्हता. त्याचे विचार स्पष्ट होते.

त्यांच्या ध्येयावर त्याची निष्ठा होती. त्याच्या डोळ्याइतके चमकदार डोळे मी कुणाचें पाहिले नाहींत. ते तेजस्वी होते पण चंचल नव्हते. त्याच्या शुद्ध मनाची आणि तीव्र बुद्धीची ते साक्ष देत. त्याच्या अलौकिक शक्तीची टिंगल करूनही तो दवणारा नव्हता कारण किर्ती अगर पैसा याचा त्याला कधींच लोभ वाटला नाहीं. त्याच्यांशीं कलाविषयक चर्चा करण्यांत एवढा आनंद वाटे कीं त्याच्या त्या दोन खोल्यांच्या स्टुडिओपुढें मला राजाचा राजवाडाही तुच्छ वाटे.'

सॅम्युअल पालमेरसारख्या ब्लेकेच्या मित्रांनी त्याच्या विषयीं काढलेले उद्‌गार वाचले म्हणजे ब्लेकेजवळच्या गूढ शक्तीलां खुळेपणा ठरवणें अगर बुवाबाजींत जमा करणें जड जाते. ब्लेकेनें स्वतःच्या या शक्तीबद्दल म्हटलें आहे कीं, 'माझ्याजवळ कांहीं अलौकिक शक्ति आहे अशी कल्पना असेल तर ती चुकीची आहे. प्रत्येक चित्रकार आणि कवि यांच्यांत ही शक्ति वास करीत असते. किंबहुना या वास्तव जगापेक्षां या अद्‌भूत सृष्टीशी त्यांचे नातें असतें. म्हणूनच ते कलाकृती निर्माण करूं शकतात. कलावंतांनी ही शक्ति वाढवायचें ठरवलें तर ते वाढवूं शकतील.'

वास्तवसृष्टीच्या अभ्यासावर ज्या लोकांचा विशेष भर होता अशा कलावंतांना ब्लेकेचा जोराचा विरोध होता. त्याच्याच काळांत होऊन गेलेला विख्यात चित्रकार रेनॉल्ड याच्या तत्वज्ञानावर ब्लेकेनें कडाक्याची टीका केली. रेनॉल्ड सांगत असे, 'प्रत्येक चित्रकारानें जास्तीत जास्त निसर्गाचा अभ्यास करायला हवा. हुबेहूब निसर्गाचें स्वरूप चित्रकाराला चित्रीत करतां आलें पाहिजे.'

या उलट ब्लेके म्हणायचा,' निसर्गाच्या बाह्याकाराची नक्कल करायला अकलेची फारशी गरज नाहीं, ती केवळ हमाली आहे. निसर्गाचें हुबेहुब चित्रीकरण करण्याच्या नादी खऱ्या कलावंतानें लागूं नये. त्यानें अंतःभूत व्हावें आणि स्वतःला होणारे दिव्य साक्षात्कार चित्रीत करावेत.'

पण यामुळें त्याचें अंतर्मुख होण्याचें वेड कधीं सुटलें नाहीं. अगदी आपत्कालींहि तो या सुखात कसा मग्न होई हें त्यानें १८०४ च्या ऑक्टोबरमध्यें हायले नांवाच्या मित्रास लिहिलेल्या पत्रांत दिसून येतें. या काळांत त्याची आर्थिक परिस्थिती भलतीच बिकट झाली होती. तरीही या काळांत तो लिहितो, 'मित्रा, माझा आनंद काय वर्णन करूं. परवां मी चित्रसंग्रहालयांत गेलों आणि एका दिव्य प्रकाशानें माझें मन उजळून निघालें. हा प्रकाश गेलीं वीस वर्षें माझ्या घराच्या दाराशीं उभा होता आणि मी मात्र काळोखांत चांचपडत होतो. आता त्या दिव्यप्रकाशानें माझें मन भरून गेलें. तुला हा सारा प्रकार कदाचित्‌ मूर्खपणाचा वाटेल पण प्रत्यक्षांत पेन्सिल हातांत धरल्यावर मला जो अनुभव येतो तो मी तुला मोकळ्या मनानें लिहिला आहे.'

ब्लेकेनी वेळोवेळीं लिहिलेलीं अशीं पत्रें पाहिलीं, त्याच्या कविता वाचल्या, अद्‌भुत वातावरणानें भरलेलीं त्याचीं चित्रें पाहिलीं, आणि त्याच्याविषयीं त्याच्या मित्रांनीं लिहिलेल्या आठवणी वाचल्या म्हणजे ब्लेकेला अंतर्ज्ञान नसेल असें म्हणवत नाही. मृत व्यक्तींशीं त्यानी घेतलेल्या भेटींत कुठेंतरी सत्याचा स्पर्श घडला असेल असें वाटूं लागतें. आणि मग डान्टेच्या व बिॲट्रिसच्या भेटीचें हें चित्र पाहून मनांत येतें, 'खरोखरी स्वर्ग म्हणून कांहीं चीज अस्तित्वांत आहे कां! स्वर्गांतले रथ हे असेच असतील कां!'





अनुक्रमणिका

वीर्य शुल्का पान २९ वरून

गुताच्या छावणीकडे धांवूं लागला. डोळे लालबुंद होते. रुंद भालप्रदेशा-वरची शीर तटतटून उठली होती.

वीर्यशुल्केचा उधळलेला घोडा कांहीं वेळानें शांत झाला होता अन् मग तिच्या जिवांत जीव आला. संवयीनुसार आपोआपच घोडा रामगुप्ताच्या छावणीकडे वळला. ती छावणीत पोंचली तेव्हां अंगातलं त्राण नाहींसं झालं होतं.

चंद्रगुप्त प्रवेशद्वारांत घुसला तेव्हां देवपुत्रवधाची बातमी छावणींत पसरलेली होती. सर्वजण त्याची वाट पहात होते. अभिमानानें फुगलेली पण श्रमलेली वीर्यशुल्का रामगुप्ताच्या भव्य तंबूकडे धांवली. एका पडद्याआड उभी राहून ती आपल्या स्वामीची मार्गप्रतिक्षा करूं लागली. तंबूबाहेर घोड्यांच्या टापांचा खडखडाट झाला. तिच्या बाजूच्या द्वारांतून भट्टारक रामगुप्त ध्रुवदेवीसह पुढें झाला. तंबूच्या प्रवेशद्वारावरचा पडदा दूर झाला.

घर्मबिंदूंनीं डंवरलेला चंद्रगुप्त उन्मादानं हंसत आंत आला. हास्याचा गडगडाट करीत भावाला आलिंगन देण्यासाठीं रामगुप्तानं पुढं झेंप घेतली, पण...पण त्याचं हास्य पोटांतच अडकलं. देवपुत्राचा बळी घेऊन आलेल्या चंद्रगुप्ताच्या सुरीची तहान अजून भागली नव्हती. विजेच्या वेगानं चकाकत तिनं रामगुप्ताच्या उदराचा ठाव घेतला. तंबूंतल्या गालिच्यावर रक्ताचीं कारंजीं उसळलीं अन् चंद्रगुप्त त्यांत न्हाऊन निघाला. आंचके देत रामगुप्तानं डोळे पांढरे केले. तें भीषण कृत्य पहाणाऱ्या दासींची भीतीनं दांतखीळ बसली. क्षणभर भयाण शांतता पसरली. पडद्याआड उभ्या असलेल्या वीर्यशुल्केनं तोंड झांकून घेतलं. चंद्रगुप्ताच्या चेहऱ्यावर क्रौर्याचा धुडगूस चालू होता. त्याच्या लालभडक डोळ्यांकडे पहायला कोणी धजावत नव्हतं. अन् मग भानावर आलेली ध्रुवदेवी एकदम ओरडली,

'मूर्ख दासींनो, पहातां काय, जयघोष करा.' अन् दासींच्या कंठांतून निघालेल्या थरथरत्या जयघोषात तिनं आवाज मिसळवला—

'भट्टारक चंद्रगुप्ताचा जयजयकार असो' शेवटच्या घटका मोजणाऱ्या रामगुप्ताच्या छातीवर पाय रोंवून चंद्रगुप्त उभा होता.

विजेसारखी धावत ध्रुवदेवी त्याच्या रक्तरंजित बाहूंच्या मिठींत जाऊन अडकली आणि पुन्हां जयकार निनादला—

'भट्टारिका ध्रुवदेवींचा जयजयकार असो.'

पडद्याआडून हें सर्व पहाणाऱ्या वीर्यशुल्केच्या काळजाचे शतशः तुकडे तुकडे झाले. चंद्रगुप्ताचं हृदय तिच्यापासून ध्रुवदेवीनं हिरावलं होतं. तिला मूर्च्छा आली.

तिनं डोळे उघडले तेव्हां तिच्यापुढें सम्राट झालेला चंद्रगुप्त उभा होता. तिरस्कारानें तिनं मान फिरवली.

'कां, मान फिरवलीस...बघवत नाहीं माझ्या तोंडाकडं ?'

'अंग जळायला कां लागलं ?' क्षणभर वीर्यशुल्का थिजल्या नजरेनें त्याच्याकडं पहात राहिली. अन मग वंचनेपोटी उत्पन्न झालेल्या त्या नजरेंतल्या चिरडीचा स्फोट झाला.

'कुठं गेलं तें प्रेम...कुठं गेलीं तीं आश्वासनं ?'

'प्रेम ! हूं. मूर्ख मुली, माझे शब्द आठव. मी कसा आहे हें तुला माहीत होतं. चंद्रगुप्तानं खेळलेल्या नाटकांपैकींच तें एक नाटक होतं, तूं माझ्यावर हवं तेवढं प्रेम कर, हुकूम करायचा अधिकार तुला नाहीं. एक उपभोग्य वस्तू यापेक्षां चंद्रगुप्ताच्या हिशेबीं तुझी जास्त किंमत नाहीं—'

कौटिल्याची राजनीति चंद्रगुप्ताच्या मुखावाटे बोलत होती, चाबकाच्या फटकाऱ्याप्रमाणें ते शब्द वीर्यशुल्केचें काळीज ओरबाडून काढीत होते, तिचं ते पहिलंच अन् पवित्र प्रेमपुष्प उपभोगाच्या विषारी वाफेंत करपलं होतं. रागानं लालबुंद होत ती एकदम किंचाळली—

'कृतघ्न भट्टारका, पुराच्या लोंढ्यातून काठीवर उचललेला संर्पसुद्धां त्यावेळीं दंश करायचं विसरून जातो; पण—' तिला मध्येंच अडवून चंद्रगुप्त मोठमोठ्यानें हंसू लागला.

'एकंदरींत याच उपकाराच्या ओझ्याखालीं तूं चंद्रगुप्ताला हातांतलं बाहुलं बनवूं पहात होतीस काय! तर मग मूढ गणिके, भ्रमनिरास करून घे, ऐक, तूं चंद्रगुप्ताचे प्राण वांचविले नाहींस तर त्याच्या कार्यांत अडथळा केलास. पौर्णिमेच्या दिवशींचा मारेकरी माझ्यासाठीं नव्हे भायर (बंधू) रामगुप्तासाठीं होता. तूं खो घातलास म्हणूनच त्याचं मरण आजपर्यंत लांबलं—'

वीर्यशुल्केला जास्त एकवेना. चित्तवृत्ति बधीर झाली. जवळ जवळ भ्रमिष्ट होऊनच ती मागें वळली. झोपेंत चालणाऱ्या माणसासारखी जड जड पावलं टाकीत निघून गेली.

त्या दिवसानंतर वीर्यशुल्केचा मह्याल ओस पडला. पाटलिपुत्रांतून ती एकदम नाहींशीच झाली. चन्द्रगुप्ताच्या विजयोत्सवांत दंग झालेल्या पौरजनांना ह्या क्षुल्लक घटनेकडे लक्ष द्यायला सवड नव्हती. ती कुठून आली अन् आतां कुठें गेली याबद्दल कुणालाच कांहीं कर्तव्य नव्हतं.

हाच चन्द्रगुप्त पुढें विक्रमादित्य नांवानें प्रसिद्ध झाला. मगधाला सुवर्णयुगाच्या कळसावर पोहोंचविणारा सम्राट ठरला. इतिहासकारांनीं, साहित्यिकांनीं त्याच्या गुणांना महत्त्व दिलं, तसंच रामगुप्तवधाची हकिगतहि सांगोपांग उजेडांत आणली. पण दुर्दैवी वीर्यशुल्केची करुण कहाणी, जी फक्त त्या दोन जीवांनाच, वीर्यशुल्का व चन्द्रगुप्तालाच ज्ञात होती, ती मात्र इतिहासाच्या चाळणींतून वाळूसारखी भुरकन् निसटली, वाऱ्यावर विरून गेली.

●●●








‘ ...फारसे कष्ट नाहीं पडले. कांहीं त्रास नाहीं अन् दु:ख तर नाहींच मुळीं. हवा तसा आनंद मिळाला. ह्यांत तुमचा दोष काय...?’...

तिनं जांभई दिली. डोळे मिटले...शब्द मंदावले... आणि...सकाळीं एकदम कळलं कीं चंदनाचं झाड कोसळलं...!





—श्रांत



माझ्या पोटीं जन्माला न आलेल्या माझ्या मुलीची ही गोष्ट. रक्ताच्या नात्यापेक्षां मानलेली नातीं कधीं कधीं खरीं असं म्हणतात, असतील. पण ती गैरसोयीचीही ठरतात. मानलेल्या मुलीचीं आसवं पुसणं कठीणं. आठशें नऊशें नोकरवर्गाचं ऑफीस. मार्च अखेरचे दिवस ऐन कामाच्या गर्दीचे. या सुमारास माणसं बदलायला नको असतात, पण जरूर पडते मग तसं करावं लागतं. हाताखालचा एकजण आजारी पडला. त्याच्या जागीं सौ. सुधा कर्वे कामाला आली. नवीन माणसाला काम शिकवावं लागत. पण वेळ फुरसतीची असली तरच जमतं. दुष्काळांतं हा तेरावा महिना. रोजच्याप्रमाणं पंधरा मिनिटं आधी पोंचलों. पांच मिनिटानंतर सुधा कर्वे आली. तिचा पहिलाच दिवस. अंगानं किडकिडीत, रंगानं काळसरपणांत जमा. नाकानं सरळ. मुद्रा शांत. पांचवारी पांढरं पातळ. नेटका किंचित सैल अंबाडा. डोळ्यांत एकप्रकारचं तेज. टेबलासमोर येऊन म्हणाली,

‘ नमस्कार. ’

शब्दांत आणि स्वरांत विनयाचा झरा. पाणी निर्मळ. हाताखालीं काम करणारी ही पहिली मुलगी नव्हती. पण आजवर असा नमस्कार कुणी केला नव्हता.

‘ ही शेजारची तुमची खुर्ची. ’

बाजूच्या खुर्चीकडे बोट दाखवीत मी म्हटलं. ती बसली.

‘ तुम्ही जरा वेळेच्या आधीच आलांत ?’ मी पुन्हा म्हटलं.

‘ होय, मी जरा आधीच येत असतें ’

‘ छान ! या जागेचं दोन चार दिवसाचं काम सांचलय. तें बघावं लागेल तुम्हांला. सुदैवानं फारसं जमलं नाही' पण तें काढावं लागेल. शिवाय हें काम तुम्हांला नवीनच नाही कां ? ’

‘ होय. ’

‘ म्हणजे शिकायला हवं. शिकवलंही असतं. पण कामाच्या गर्दीचे दिवस. फुरसत कमी सध्या. तीस वर्षांत पुष्कळांना शिकवलंय. ’

‘ पहिल्यान्दां जमणार नाहीं कदाचित्, पण थोडसं समजलं म्हणजे—’

‘ तसं मी जरूर सांगेनच. ’

‘ मग मला विश्वास आहे. ’

‘ ठीक. ’









अनुक्रमणिका

मग तिनं पहिली केस वाचली. थोडीशी अडली. संकोचानच मला विचारलं. मी खुलासा केला. तास दीड तासानं इतर कागदांत तिनं लिहिलेली केस आली. तिच्याकडं पाहिलं. जराशा भीतीनं ती माझ्याकडेच बघत होती. तिनं लिहिलेलं मी वाचलं.

'हें बघा मिसेस कर्वे.' मी तिला बोलावीत म्हटलं.

ती जवळ येऊन उभी राहिली.

'कांही चुकल तर नाहीं ?' तिनं विचारलं.

'फारसं नाही. अगदीं थोडंसंच. तुमचं अक्षर चांगलं आहे. पहिलीच केस 'पण त्या मानानं चांगलीच लिहिलीय्. चांगलं काम करालसं वाटतंय्.'

ती आनंदल्यासारखी दिसली. आपल्या जागेवर गेली. १॥ वाजतां अर्धातास विश्रांतीची वेळ. मी तर दहा मिनिटांतच नेहमीप्रमाणं जागेवर आलों. सारा हॉल रिकामा. माझ्या मागोमाग तीहि आली.

'दहा मिनिटांतच आलांत ?' मी विचारलं.

'हो मी असेंच करतें नेहमीं.'

'काय म्हणून असं ?'

'हो, ते मी आपल्याला विचारणारच होते.'

'काय ?'

'मला कांही दिवस तरी अर्धातास आधी सुटी हवी. त्यासाटीं या अर्ध्या तासाच्या सुटींत मी काम करते, म्हणजे कामांत कमी नको.'

'तुम्हांला तसंही लवकर जातां येईल.'

'तें मला प्रशस्त नाही वाटत.'

'ठीक आहे. आपण लवकर जाऊं शकता. कदाचित्—'

'सुभाष दोन वर्षांचा आहे म्हणून—'

'तुम्ही नानासाहेब साठ्यांची मुलगी ना ?'

'होय. आपल्याला आहेत ते माहित ?'

'तर त्यांच्या हाताखालीं थोडे दिवस मी काम केलंय. '

'मला नव्हतं माहित. आतां तर बरंच झालं, पण अर्धा तास कामाची भरपाई जरूर करीत जाईन. '

'ठीक आहे. नाहीं तरी शेवटचा अर्धा तास पुष्कळसे लोक आवराआवरींतच घालवतात. '

'असेल पण मला आधी जायची जरूर आहे, एवढं खरं '

'होय. त्याचं कारणही तुम्ही सांगितलंच आहे. '

'शिवाय संध्याकाळचा स्वयंपाक माझ्यावरच—'

'अस्सं. घरांत दुसरं कुणी नाहीं ? खरं म्हणजे इतकं थकल्यावर स्वयंपाक म्हणजे—?'

'इतर आहेत. पण त्यांना म्हणायचं कसं ? थकलं तरी काय ? नोकरी करणं भाग आहे. सकाळचा स्वयंपाक सासूबाईकडे. म्हणून दहा मिनिटं आधी येतें. '

मग कचेरी सुटायला अर्धा तास असतांना ती आली आणि तिनं विचारलं,

'मी जाऊं ? '

'होय. '

अशी सुरवात झाली. फुलाचा सुगंध दरवळायला लागला. फुलाला आपला सुगंध लपविणं कसं शक्य होतं !

एकानं एकदां आडून प्रश्न केला,

'कर्वेबाई, तुमचं सगळ्यांत लहानगं किती वर्षांच ? '

त्या मुलीनं प्रश्नाचा रोख ओळखला. तिच्या कपाळाला किंचित्शी आठी पडली. मग ती शांतपणानं खालीं बघतच म्हणाली,

'सुभाष आतां सहाचा '

भाग्यवान आहांत ! '

'होय '

'हें जमतं कसं. ? ' जरा धिटाईचा खवचट प्रश्न.

ती एकदम गंभीर झाली. उत्तर द्यावं कीं टाळावं याचा विचार केल्याखारखा दिसली अन् खूप गंभीरपणानं म्हणाली—

'संयमानं सारं जमतं '

आणि ती कामांत गर्क झाली. गोष्ट तेवढ्यावरच आटोपली. विचारणाऱ्याला तिनं तटकन् तोडलं होतं. कुणाशीं कसं बोलावं याचं तिला ज्ञान बरं असावं. मग एकदां तिच्या या उत्तराचा धागा जोडून मी प्रश्न केला,

'संयम आणि लग्न ! तुम्ही लग्न तरी कसं केलंत मिसेस कर्वे ? '

माझ्या प्रश्नावरची तिची प्रतिक्रिया बघायला लागलों. ती शांतपणानं म्हणाली,

'मी लग्न करणारच नव्हते ! '

मग काय करणार होता ? '

'विनोबांच्या मेळाव्यांत जाणार होते. नाहीं तर—'

'नाहींतर काय—? '

'डॉक्टर होऊन धर्मार्थ दवाखान्यांत पट्ट्या बांधणार होते'

'अस्सं, मग तुम्ही लग्न कसं केलं ? '

'हा सारा नानांचा आग्रह. हें सारं त्यांच्यासाठीं '

'अगदीं खरं ? '

'होय '

'पण कां हो मिसेस कर्वे तुमचा तर प्रीतिविवाह असं कांहींसं ऐकतो ? '

मी किंचित् हंसून.

'काय चेष्टा करतां ? '

'म्हणजे, तुमचे नाना नाहीं कां कधीं चेष्टा करीत ? तसंच मीहि विचारतों. हवं तर प्रश्न मागें घेतो '

'तसं नाहीं म्हणत ! '

'मग हें घडलं कसं ? '

'नानांच्या मागं नातेवाईकांनीं भुणभुण लावायला सुरवात केली. मी चांगली शिकत होते. शिकवीतही होते. कॉलेजच्या पहिल्या वर्षांत होते. मॅट्रिक फर्स्ट क्लास होते '

'शिकवत होते म्हणजे ? '

'म्हणजे शिकवण्या करून स्वतः शिकत होते आणि भावंडानांहि शिकायला मदत करीत होते. नानांचा पैसा अपुरा '

'म्हणजे तुमच्या नानानां मुलगे तीन तर ! '

'हो गमतीनं मला ते तिसरा मुलगा समजायचे. नानांचा पसारा जरा जास्तीच '

'म्हणून तुमचा आटोपशीर. तीन नाहीं कां ? '

यावर ती संकोचानं अवघडली. सुरेखशी लज्जेची लहर उमटून गेली.

'मग तुमचं शिकणं का थांबलं ?'

'सांगितलं ना, लोकांची भुणभुण नानांच्या मागं कीं 'पोरीचं लग्न कर.' एक दिवस मला पहायला एक मुलगा आला. येतानांच पाहिला. मनांतनं नकोसा वाटला. नाना घरांत आले. बैठकींत सारे बसले. नाना म्हणाले 'चहा आण बाहेर सुधे' मी पटकन निश्चय केला अन् म्हटलं, 'नाना त्यांना जायला सांगा. मी चहा आणणार नाहीं.' नाना रागानं लाल झाले. आई रागावली. नाना पुन्हां म्हणाले, 'सुधे मला तोंडघशी पाडतेस ?' पुन्हा धीटपणानं मी म्हटलं, 'नाना मुलगा मला आवडला नाहीं.' ते म्हणाले, 'काय झालंय त्याला ?' मी निक्षून म्हटलं, 'नाना आजपर्यंत कितीदां तरी सांगितलंय ना कीं मी मला लग्न करायचंच नाहीं म्हणून ' त्यावर ते म्हणाले, 'सुधे तुला लग्न करावंच लागेल.' 'असंच असेल तर या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






माझ्या शब्दानं त्या गरीब म्हाताऱ्या हाडावर शेरभर मांस चढलं. ऊर भरुन ते म्हणाले,

'मग घरांत चलाच. तिच्या आईला सांगा मला सांगितलंत ते. तिला बरं वाटेल.'

'आत्तां वेळ नाहीं. या रस्त्यानं चाललों म्हणजे तुमची आठवण हटकून येते. यावसं वाटतं, पण कामाच्या गडबडीनं राहून जातं. आज अनायासें दिसलात बरं झालं. आतां खरंच वेळ नाहीं. त्यांना सांगायला पुन्हां कधीं-तरी येईन. शिवाय तुम्हीहीं बाहेर निघालांत—'

'मी चाललो होतो पुराणाला, रोजच जात असतो. आज तुम्हीच इथं पुराण ऐकवलंत, तेव्हां रोजच्या पुराणाला आज रजा. चला घरांत—'

'आत्तां नाहीं. पुन्हां कधीं तरी. अगदीं वचन.'

मग मी चालूं लागलों. किंचित् मुरडून पाहिलं. घरांत जावं कीं पुराणाला या विचारात नानासाहेब घुटमळल्यासारखे भासले.

कचेरींत सुधेची भेट. गेल्याबरोबर रोजच्या नियमाप्रमाणें नमस्कार मग प्रश्नाला सुरवात.

'आज तुम्ही मिठाई कसली वाटली ?'

'मी ? अन् मिठाई वाटली ? कोण म्हणतं ?' प्रश्नाचा अर्थच कळेना मला.

'नाना घरीं येऊन सांगत होते. कसली मिठाई दिली त्यांना ?'

'अस्सं,' थोडासा प्रकाश पडून मी.

'कसली मिठाई वाटलीत ?' पुन्हां प्रश्न.

'मिठाई वाटलां म्हणून त्यांनीं सांगितलं ?' माझं आश्चर्य.

'होय. उभ्या उभ्या आले अन् म्हणाले, 'सुधे, चहाबिहा टाकूं नको. तुझ्या कचेरी-तल्या देशपांडे साहेबानं आज मला मिठाई दिली एवढंच सांगायला आलों. चहा टाकते म्हणतां म्हणतां ते गेलेच. मला कांहीं समज-लेच नाहीं म्हणून विचारतें.'

मी जरा गडबडलों. सकाळचे माझे शब्द आठवले. अवघडलों. म्हटलं सांगितलंच पाहिजे. मग सकाळीं नानांना म्हटलं होतं तें सांगून टाकलं. स्तुतीला पात्र नसल्याची तिची मुद्रा अन् एकही अक्षर न बोलतां, कामांत डोकं खुपसलं. माझ्या कामांत मी गर्क.

त्याच संक्रांतीनंतरचा दुसरा दिवस. कचेरीं-तला एकेक सहाध्यायी समोर तिळगूळ ठेवा-यला लागला. प्रत्येकाला तोंडानं आशिर्वाद देत होतो. बरोबरच्यांना तिळगूळ दिला-घेतला. गोड मागेची अपेक्षा व्यक्त केली. सर्वांत ओसरली मग आली सुधा. तीच उरली होती.

'हा माझा तिळगूळ. नमस्कार.'

तिनं फार फार नम्रतेनं हात जोडले. इतके लोक नमस्कार करुन गेले होते पण अवघडलो नव्हतो, पण आतां अवघडलो होतो.

'तुम्हांला काय आशिर्वाद देऊं, मिसेस कर्वे ?' मी म्हटलं.

'भलता सलता देऊं नका म्हणजे झालं !' कांहीं तरी चमकून ती म्हणाली.

तिनं म्हटलं हें बरं केलं. कारण तिला नको तसा आशिर्वाद माझ्या तोंडांतनं निसटताही.

'बरं तर. तुम्ही सांगा तोच अशिर्वाद देतो. मग झालं ! काय हवायं आशिर्वाद'

मी म्हटलं.

'सवाष्णपणी लवकर मरण.' माझ्याकडे न बघतां अगदीं गंभीरपणानं तिनं म्हटलं.

'ठीक. तसंच होवो.' मीही पटकन् आशि-र्वादपूर्वक म्हणालों. चमत्कारिक वाटलं जरा. संक्रांतीच्या वेळेला तिनं सौभाग्य मागितलं तें बरोबरच. पण ते अशा अर्ध्या वाटेवर, यामुळं मी झाकळलों.

या प्रसंगाची आठवण ताजी असतानांच तिची एक दिवसाच्या आजारपणाची चिठ्ठी आली. पुढें ती तीन दिवसाची झाली. मग पंधरा दिवसाची, पुढें तर दोन महिन्यांची. नानांकडं एकदां जाऊन आलों. कर्व्यांकडेही एकदां जाऊन भेटलों. चार-पांच दिवसांनीं कळलं कीं तिला हॉस्पिटलमध्यें हलविलें म्हणून कधीं कळायचं चढ आहे म्हणून, तर कधीं कळायचं दुखण्याला उतार आहे म्हणून. एकदां कळलं जरा जास्त आहे. दोन दिवसांची सुटी आल्याचं बघून हॉस्पिटलमध्यें जाऊन भेटायचं ठरवलं.

सकाळचा चहा घेतला. स्नान आटोपलं. जायला निघालों. पत्नी पूजेला बसली होती. गंध उगाळीत होती. खोड अगदीं झिजून हातांत धरवत नव्हतं. एकाएकीं सुधेची आठवण आली. तिच्याकडेच जायला निघालों होतों. कोट चढवून निघालों. हॉस्पिटलचा रस्ता चालतां चालतां मनात घोळायला लागली झिजणारं चंदन आणि सुधा. तीही अशीच चंदनासारखी झीज झीज झिजत होती. जिथं जाई तिथं झिजे. घरीं, कचेरींत, मैत्रिणींत. जो भला भेटला त्याच्यासाठीं झिजत होती. आपल्या गुणाचा मंद सुगंध देत देत झिजत होती. देहाच्या चिमटीत जिवाच्या पांकळी मावत नव्हती, इतकी देहाची चिमटी लहान लहान होत होती. पण ती कष्टानं फडफडत होती. देहाची तीन चिमटी राख जमिनीवर टाकून तिच्या आत्म्याचं सोन्याचं पांखरुं भर्रकन उडून जायच्या बेतांत आलं होतं. तरी ती झिजत होती. मी तिला मनात 'चंदन' म्हटलं, तेंच तिचं नांव ठेवलं. पोटीं आली असती तर मायेनं कुरवाळलं असतं. आयुष्यांत पहिल्यानदां येते आई. मग बहीण. पुढे येते पत्नी ती योगानं. कानावर विश्वास ठेऊन, डोळ्यानं बहुतेक तिचं रूप जोखून घरात येते ती पत्नी, पण तिचा लोभ असा कीं, आई, बहीण दूरच्या वाटायला लागतात. म्हणजे सारं खोटंच. पण मुलगी नेहमी हवीशीच. निर्भे-ळाच्या आनंदाचं मूर्त स्वरूप. आपलेपणाचा आरसा. अशा या मुलीला भेटायला मी हॉस्पिटलची वाट चालत होतो आणि चालता चालतां सुधेचा—चंदनचा विचार करीत होतो. आज तिची प्रकृती कशी असेल ? चढावावर कीं उतारावर ? दुखणं उतारावर असेल तर चार शब्द बोलूं. डोळ्यानं बघूं. हसून दिलासा देऊं. पण अजून दुखणं चढावावरच असेल तर ? तर काय नुसत बघूनच येऊं. बोलायचा त्रास द्यायचाच नाहीं. डोकावून बघूं. नुसता कानोसा घेऊन येऊं. एकेक मनात योजीत होतो. क्षणात गंभीर होत होतो. क्षणात आशेनं हलकसं वाटत होतं. मग हॉस्पिटलच्या आवा-रात शिरलों. छातींत जरासं धडधडायला लागलं. आजारी माणसाला भेटायला जाताना मी असाच अवघडतो. उगाचच धीर सुटतो. उंच उंच इमारती बघून जीव दबकला. जिकडं तिकडं रोगीच रोगी. सुधेची खाजगी खोली होती. दारावर पडदा सोडलेला दिसला. पायात कॅनव्हासचे बूट होते तरी पाऊल न वाजवतां गेलों. दाराबाहेरच खुर्ची होती. तीवर क्षणभर बसलों. ऐकूं यायला लागलं म्हणून तसाच बसला. तेवढ्यासाठींच पडदा सोडला असावा.

'तुझ्या अगदीं जिवावरचंच दुखणं होतं'—मिस्टर कर्वे.

'कोण म्हणतं ? तसे आम्ही सगळे चिवट आहोंत'—क्षीणशा आवाजात सुधा.

चांगलंच स्पष्ट ऐकूं येत होतं. दाराकडेच तिची उशी असली पाहिजे.

'कुणी कशाला म्हणायला हवं ? सगळेच तसं म्हणतात. माझ्यामुळं तुला हा त्रास. मला वाईट वाटतंय बघ सुधे.'









'तुमचा काय दोष ? दुखणं मला अन् दोष तुमचा हें कसं ? तसं कांहीं नाहीं. दुखणं कुणाच्या हातचं कां आहे ?'

'नाहीं कसं ? तुला कष्ट फार पडले. त्यामुळे हें असं झालं. नोकरीचे अन् घरचे कष्ट तुला झेपले नाहींत. पण मी तरी काय करूं ? परिस्थितीनं मी कात्रींत सांपडलों खरं ना ?'

'पण मी कधीं तसं म्हटलं कां दाखवलं ? मला नाहीं कां कळत सगळं. माझ्या दुखण्यांत मी बघतेय कीं तुम्हींच फार लावून घेता. उगीच हळहळतां, अगदीं कारण नसताना.'

'तसं नाहीं ग, पण तुला कष्ट दिले हें माझं मला खातं.'

" पण तें कारण नसतांना हें चुकतं. कष्टांत मला आनंद आहे. समाधान आहे. ज्यांत समाधान आहे त्यांत कष्ट कसले !'

'खरं नाहीं हे. मला माहीत आहे कीं आयुष्यांत तुला काय करायचं होतं अन् काय करावं लागलं. चुकीचं घर निवडलंस—

'पुढं काय म्हणणार आहांत तेंही माहीत आहे मला. एकटी राहून जगाचे कष्ट उपसायची हौस होती. खोटं नसेल तें. पण जें करावं लागलं तो सुद्धां त्यांचाच भाग. फरक एवढाच कीं एका घरापासून सुरुवात केली. शपथेवर सांगते मला फारसे कष्ट मुळीं पडले नाहींतच. पडले त्याचा त्रास नाहीं अन् दुःख तर मुळींच नाहीं. अगदीं हवा होता तसा आनंद आहे. तुम्ही हळहळूं नका. मला दुःखी समजूं नका. तुमचं घर पाहूनच मी स्वतःहून खाऱ्या तयारीनं तुमच्या घरांत पाऊल ठेवलं. पदरांत घेतलीत तेव्हां तुमची झाले. पूर्वीची मी संपले.'

'सुधे, आज तूं फार बोलतेयस हं—'

'कारण आज मला फार फार बरं वाटतंय, इतकं कीं सांगतांच येत नाहीं. असं कसं एकदम बरं वाटायला लागलंय हो ! आज खूपखूप बोलावसं वाटतंय.'

'खरं आहे. पण इतकं बोलूं नकोस. मनमोकळेपणानं बोलायला तशी फुरसत सांपडली नाहीं. घर कचेरी, दुसरें काम, पाहुण्याचा राबता, लहान घर, घरात माणसांची गर्दी. पण सगळं काहीं सोसलंस.'

'सान्यांसाठीं सोसायला नको होतं कां ? मुलांसाठीं, तुमच्यासाठीं, वन्संसाठीं भावजींसाठीं—'

'तें खरं पण तुझं काय ? तुझा देह झिजली, माझ्या डोळ्यादेखत मी झिजूं दिला'

'मग काय देवाचे देव्हारे माजवायचे ? स्त्रीनं कष्टाला भ्यायचं ?'

'तसं नाहीं ग, पण आपल्या जिवाकडं तूं बघितलं नाहींस अन् मलाही कांहीं करतां आलं नाहीं. उघड्या डोळ्यानं तुला कष्ट दिले नाहीं ?'

'तसं मला क्षणभरही वाटलं नाहीं. जे व्हावसं वाटतं होतं तेंच होतंय, मला अगदीं आनंद आहे, समाधान आहे. नानांनीं मला एकदां सांगून ठेवलंय—'

'काय ?'

'ठेविलें अनंतें...'

'हां तूं आतां फारच बोलायला लागलीस सुधे, पुन्हां सांगतो.'

'कारण मी पुन्हां सांगतें कीं आज मला खरंच बरं वाटतंय. मी बरी होणार, कचेरींत जाणार, काम करणार, घरी येऊन काम करणार. गाडी पुन्हां रुळावर.'

'तें पुढं बघूं. आधीं खडखडींत बरी तर हो. तुला झोंप येतेय वाटतं ?'

'हं, आज जरा जास्त झोंप येतीय्. झोंप येणं चांगलं म्हणतात. मी जरा झोंपते. पांघरूण वर ओढा. नाना किंवा कुणी आलं तर उठवा. मुलं आली तर जरूर हं.'

'मग शब्द मंदावले. तिनं जांभई दिल्याचा आवाज आला. डोळ्यावरचे पडदे अलगद पडले असावेत. डोळ्यांतलं पाणी शांत. त्यांत बुबुळांच्या मासोळ्या. त्या आपले लवचिक पंख वल्हवीत हळूंच पाण्याच्या तळाशीं दडल्या असाव्यात. वर पापण्यांची नाजुकशी जाळी पसरली असावी. एकदम क्षणभर शांत झालं.

मिस्टर कर्वे बसलेली खुर्ची वाजतांच सावध झालों कदाचित ते बाहेरही येतील म्हणून उठून उभा राहिलों. माझी खुर्ची न वाजवतां सावधगिरीनं. तितक्यांत ते बाहेर आलेच. त्यांना पहिला प्रश्न करायची संधी न देतां हुषारीनं मीच म्हटलं.

'खोली सांपडायला वेळ लागला. मोठं हॉस्पिटल, हीच ना खोली म्हणून विचारणार एवढ्यांत तुम्हीच दिसलांत बरं झालं.'

'केव्हां आलांत साहेब ?'

'हा काय तुम्ही बघतां आहांत असाच. पांच सेकंदही झाली नसतील. सुधाताईंची प्रकृती काय म्हणतेय ?'

'तिचा किनई इतक्यांतच डोळा लागलाय बघा. पांच मिनिटापूर्वी येतां तर तुमच्याशीं बोलली असती. आज तिला खूपच बरं आहे.'

'देव करो. आराम पडो. फार चांगली मुलगी. नानासाहेब भाग्यवान.'

'सकाळपासनं तिला झोंप येतेय बघा–'

'ठीक आहे. त्यांना झोपूं द्या. उठवूं नका. जाग्या झाल्यावर आठवणीनं सांगा कीं मी चौकशीला आलों होतो म्हणून. मी येतों तर.'

समाधानानं मग मी तिथून परतलों, डोळ्यानं तिला बघितलं नव्हतं इतकंच.

घरीं आल्याबरोबर पत्नीनं चौकशी केली. कारण सुधा एकदोनदां सहपरिवार येऊन गेली होती. मी सांगितलेलं ऐकून तिला बरं वाटलं. ती सुद्धां एक आईच. सुधेच्या आरामाच्या सुखात झोंपलों.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठलों. बैठकींत माझा चहा आला. तो प्यायला लागलों. पत्नी आंत गंध उगळायला लागली. सहाण खोड वाजायला लागली. मनांत आली. पुन्हा चंदन आणि पुन्हां सुधा. अजून कपांत चहा होताच. एवढ्यात फाटकाशीं अनोळखी तरुण दिसला. आंत येऊन तो म्हणाला,

'देशपांडे इथंच रहातात ?'

'होय मीच ' उभा राहून मी म्हटलं.

'नानांनीं सांगितलंय कीं सुधाताईला तिच्या घरीं आणलयं ' तो चाचरला.

'म्हणजे ? ' मी भिऊन विचारलं.

'त्या पहाटेच गेल्या. लगेच घरीं आणलं. नानांनीं सांगितलयं.'

पुढं अगदीं न बोलतां तो गेला. मी मटकन् खुर्चीत बसलों. गळा दाटला. डोळे पाणावले. देवाचा अंश देवाकडे गेला होता.

चंदनाचं झाड कोसळलं. सुधा म्हणजे अमृत . त्याला चंदनाचा सुवास भरला होता. चंदन आणि सुधा. पोटीं येती तर लहानपणीं खांद्यावर थोपटली असती, तिला अशा रीतीनं खांदा देणं आलं.

अशी ही चंदन. पंचकन्यानंतर सहावी. आठवणीनं हरघडीला जन्मते. तिला गोंजारतो, थोपटतो. तिच्या चंदनी गुणांचं अवघ्राण करतों.

●●●






# आजोबांचा पलंग कोसळला तेव्हां—

आमच्या आजोबांचा पलंग अगदीं जुना झाला होता. तो केव्हांतरी कोसळून पडणार आणि वरचें जड छत आजोबांच्या डोक्यावर कोसळून त्यांचा कपाळमोक्ष होणार अशी भीति आम्हांला–विशेषतः आईला नेहमींच वाटत असे. आजोबांना आम्हीं खूप सांगून पाहिलं. पण आजोबांचा स्वभाव फार हट्टी. त्यांचें म्हणणें, ' हा पलंग माझ्या आजोबांचा ( म्हणजे आजोबांच्या आजोबांचा ) आहे आणि मी ह्यात असेपर्यंत त्यावरच झोंपणार.'

आजोबा एकदां कुठें बाहेर गेले असतां ( ते मधून मधून असे बाहेर जात ते आठ आठ दिवस घरीं परत येत नसत. आणि आले म्हणजे येतांना ' नऊ वारीं नेसायची सोडून पांच वारीं फडकीं कमरेला गुंडाळून गांवभर फिरतात सटव्या,' असें किंवा ' कृष्णा, बेट्या मजा आहे तुझी. सोळा हजार एकशें आणखी वर आठ हं ' असें कांहींतरी बडबडत येत. ) बाबांच्या मनांत आलें कीं आपण आज आजोबांच्या पलंगावर झोपावें. हा पलंग एका बाजूच्या खोलींत असल्यानें आपल्याला शांत पडून ' विचार ' करतां येईल असें ते म्हणाले. ( सेवानिवृत्त झाल्यापासून आपण एखादी ' डिटेक्टिव ' कादंबरी लिहावी असें त्यांना फार फार वाटत असे. ) या गोष्टीला–म्हणजे त्या पलंगावर झोंपण्याच्या बाबांच्या कल्पनेला–आईनें कसून विरोध केला. तिनें बाबांना साफ सांगितलें, ' मामंजी बाहेर गेले असतांना तुम्ही कधींतरी त्या पलंगावर झोंपाल आणि तो कोसळून तुमचा कपाळमोक्ष होईल असा साईबाबांनीं मला स्वप्नांत ' दृष्टांत ' दिला आहे. तेव्हां मी तुम्हांला त्या पलंगावर झोंपूं देणार नाहीं.' ( आमच्या आईला स्वप्नांत पुष्कळदां शिरडीचे साईबाबा दिसतात. ते तिला पुढें येणाऱ्या अरिष्टाची पूर्वसूचना देतात. यालाच ती ' दृष्टांत ' असें म्हणते. ) बाबा म्हणाले, ' तूं एरवीं सांगितलेलें मी ऐकलें असतें. पण तुला असा ' दृष्टांत ' झाला असेल तर मी मुद्दामच त्या पलंगावर झोंपणार. पाहूं या काय होतें तें.' ( आमच्या बाबांचा साईबाबांवर मुळींच विश्वास नाहीं. त्यांच्यामुळेंच आपण इंग्रजी पांचवींत नापास झालों असें ते नेहमी म्हणतात. याचा जास्त खुलासा मात्र ते करीत नाहींत. ) तात्पर्य, आईच्या विरोधास न जुमानतां बाबा त्या रात्रीं आजोबांच्या पलंगांवर झोंपले.

त्या रात्रीं पलंग कोसळल्यानंतर झालेल्या गोंधळांत आणखी एका गोष्टीमुळें भर पडली. माझा मावस भाऊ विनू त्या दिवशीं आमच्याकडे राहायला आला होता. या विनूला नेहमीं अशी भीति वाटते कीं आपण झोंपलों असतां झोंपेंत आपला श्वास कधींतरी बंद पडेल आणि आपण

घुसमटून मरून जाऊं. यावर उपाय म्हणून तो रोज रात्रीं तासातासाचा गजर लावून झोंपतो. प्रत्येक वेळीं आपला श्वास बंद पडत नाहीं अशी खात्री करून घेऊन तो पुन्हां झोंपतो. आम्ही एकाच खोलींत झोंपणार असल्यानें गजरामुळें दर तासाला माझी झोंपमोड झाली असती. तेव्हां ‘ माझी झोंप फार सावध आंहे. माझ्याच खोलींत झोंपलेल्या कुठल्याहि माणसाचा श्वास बंद पडला तर मला लगेच जाग येईल. तेव्हां तूं गजर लावूं नकोस ’ असें मी त्याला सांगितलें. कसा कुणास ठाऊक पण या गोष्टीला तो कबूल झाला. अर्थात् तो माझी एकदां तरी परीक्षा घेणार याची खात्री असल्यामुळें मी आधीं गाढ झोंपेचें ढोंग केल व त्यानें आपला श्वास रोखून धरतांच मी त्याला उठविलं. त्यामुळें खात्री वाटून तो नंतर अगदीं गाढ झोंपीं गेला. ( झोंपण्यापूर्वी त्यानें थोडें कापराचें पाणी करून उशाशीं एका कपांत ठेऊन दिलें. यदाकदाचित् झोपेंत श्वास बंद पडला असतां मी त्यास उठवलें नाहीं तर कापराच्या वासाने त्यास जाग येईल असें तो म्हणाला. )

आमच्या आईच्या घराण्यांतील सर्वच माणसाचें असें कांहीं तरी खास वैशिष्ट्य आहे. आमच्या अरुणा मावशीला नेहमीं असें वाटतें कीं, आपला जन्म गिरगांवांत झाला. आपलें लग्नहि गिरगांवांतच झालें, तेव्हां आपला मृत्यूहि गिरगांवांतच होणार. म्हणून ती गिरगावांत कधीं जात नाहीं. दुसरी आमची सुनंदा मावशी. ( हिला आम्हीं शिटी मावशी असेंहि म्हणतों; पुरुषांसारखी तोंडांत दोन बोटें घालून हिला शिटी वाजवतां येते. हिला नेहमीं असें वाटतें कीं रात्रीं आपण झोंपल्यानंतर चोर घरांत शिरतील, आपल्याला क्लोरोफॉर्म देऊन गुंगी, आणतील आणि मग पलंगाला बांधून ठेऊन सारी चीजवस्तु घेऊन निघून जातील म्हणून ती रोज रात्रीं निजण्यापूर्वीं घरांतील सर्व मौल्यवान वस्तु बाहेरील खोलींत गोळा करून ठेवते आणि त्यावर ‘ हें एवढेंच माझ्याकडे आहे तें घेऊन जा. कृपा करून मला क्लोरोफॉर्म देऊन पलंगाला बांधून ठेवूं नका’ अशी चिठ्ठी लिहून ठेवते. तिसरी आमची सुरेखा मावशी. आपल्या घरांत चोर शिरतील अशी सुनंदा मावशीला भीति वाटते, पण आपल्या घरांत रोज चोर ‘ शिरतात ’ असें सुरेखा मावशीचें म्हणणें. म्हणून रोज रात्रीं निजण्यापूर्वीं घरांतील सर्व चपला ती आपल्या पलंगाखालीं एकत्र करून ठेवते व रात्रीं अधूनमधून ‘ अे ’ ‘ कोण आहे रे ?’ ‘ पकडा, पकडा ’असें ओरडून बाहेरील दाराच्या दिशेनें एक एक चप्पल फेंकते. कधीं कधीं ती पांच सहा चपला फेंकते. कधीं कधीं सगळ्या फेंकते,यामुळेंच घरांत शिरलेले चोर पळून जातात असें तिला वाटतें. ( तिच्या यजमानांना आतां या गोष्टीची इतकी संवय झाली आहे कीं या आरडाओरडीनें व चपला फेंकण्याच्या आवाजानें त्यांना मुळींच जाग येत नाहीं. )

## ग्रीष्म सौन्दर्य—



हा ग्रीष्मऋतू कामिनींची कमनीयता किती वाढवितो म्हणून सांगूं ? चंदनाचा लेप केल्यामुळें त्यांच्या अंगकांतीची शोभा वाढलेली असते. मुखाला ओलावा रहाण्यासाठीं खाल्लेल्या तांबूलामुळें ओंठ लाल चुटुक आणि लसलसित दिसतात. कारंजाखालीं स्नान केल्यानें नेत्रांतील काजळ वाहून जाऊन तें रक्तोत्पलाप्रमाणें शोभून दिसतात. वेणींत माळलेल्या पुष्पांचा सौरभ खुल्या झालेल्या आर्द्र केसांतून उधळत असतो आणि भिजलेलें पातळ वस्त्र सर्वांगाला चिकटलेलें असतें, अहाहा, ती शोभा काय वर्णावी.

—अमरु शतक

असो, हें विषयांतर पुरें. वास्तविक आजोबांचा पलंग कोंसळला तेव्हां काय झालें तें मी तुम्हांला सांगणार आहे, सांगतों.

रात्रीं झोंपायची वेळ झाल्यानंतर ‘तीन तरी खून झालेच पाहिजेत,’ असें कांहीतरी बडबडत बाबा वर आजोबांच्या खोलीकडे निघून गेले. पलंग कोंसळलाच तर आपल्याला लगेच जाग यावी म्हणून त्या खोलीच्या खालच्याच खोलींत आईनें आपलें अंथरूण टाकलें. छोटा मधू आईजवळच झोंपला. माझा मोठा भाऊ श्रीकांत नेहमीप्रमाणें बाहेर गॅलरींत झोंपला. मी आणि माझा मावसभाऊ विनू वर आजोबांच्या खोलीला लागूनच असलेल्या माझ्या खोलींत झोंपलों. आमचा टॉमी नेहमीप्रमाणें बाहेर गॅलरींत श्रीकांतच्या खाटेखाली पसरला होता.

आजोबांचा पलंग कोंसळला तेव्हां आमच्या घराची अशी वर सांगितल्याप्रमाणें एकंदर परिस्थिति होती.

आतां आजोबांचा पलंग खरोखरच कोंसळला अशी आतापर्यंत कदाचित तुमची समजूत झाली असेल. तशी झाली असली तर तीचुकीची आहे. आजोबांचा पलंग मुळांत कोंसळलाच नाहीं. काय झालें तें सांगतों.

आमच्या घरांत एक घडी घालतां येणारी प्रवासी खाट आहे. या खाटेच्या दोन्ही बाजू वर करून ती बंद करतां येते. मात्र तिच्यावर मध्यभागीं नीट झोंपावें लागतें. लोळत लोळत एका बाजूला गेल्यास ती त्या बाजूला उलटते. त्या रात्रीं खरा प्रकार हाच झाला. या खाटेवर मी झोंपत असे. विनूला उठविण्याची जबाबदारी शिरावर असल्यामुळें म्हणा किंवा दुसऱ्या कांहीं कारणानें म्हणा, कधीं न लोळणारा मी त्या रात्रीं लोळत लोळत एका बाजूस गेलों व त्या बाजूस खाट कलंडून मी खालीं व खाट माझ्या अंगावर कोंसळली. आजोबांचा पलंग कोंसळणार या भीतीनें अर्धवट जागीच असलेली आई त्या आवाजानें दचकून उठली व ‘ अरे पलंग कोंसळला रे कोसळला ’ असें ओरडूं लागली. तिच्या ओरडण्यानें मधू जागा होऊन रडूं लागला. त्यांचा ओरडा ऐकून बाहेर गॅलरींत झोंपलेला टॉमी उठून जोरजोरानें भूंकूं लागला व त्या आवाजानें व घरांतील गोंगाटानें बाहेर झोंपलेला श्रीकांत जागा होऊन ‘ आई, दार उघड. दार उघड. ’ असें ओरडत दार ठोकावूं लागला. खाट पडल्यामुळें मला ‘ किंचित ’ जाग आली होती. परंतु मी परत लगेच झोंपीं गेलों होतों. तो या ओरड्यानें जागा झालों. खाटेखालीं सांपडल्यामुळें माझा श्वास कोंडूं लागला. एकंदर परिस्थिति लक्षांत येतांच मी ‘ अरे, खाट उचला. माझा श्वास कोंडतो आहे ’ असें ओरडूं लागलों. विनू सुद्धां आतां जागा झाला होता. ‘ माझा श्वास कोंडतो आहे ’ हें माझें ओरडणें ऐकून त्याचाच श्वास कोंडत आहे असा त्याचा समज झाला व ‘ मला वांचवा, मला वांचवा ’ असें

तो ओरडूं लागला. उशाशीं असलेला कापराच्या पाण्याचा कप हुंगण्यासाठीं म्हणून त्यानें नाकाशीं नेला. तो कलंडून कापराचें पाणी त्याच्या नाकातोंडावर सांडलें व त्यामुळें आग होऊन तो जास्तच ओरडूं लागला व 'हवा, पंखा, वारा, खिडक्या उघडा, खिडक्या उघडा' असें ओरडत खिडकीजवळ धांवला. खिडकीची कडी पटकन् न उघडल्यामुळें त्यानें हातांत आली त्या वस्तूनें तावदान खाडकन फोडून टाकलें. आरडाओरडा ऐकून शेजारच्या वाडींत रहाणारें एक गुजराथी कुटुंब जागें झालें होतें. आतां खिडकीच्या कांचा फुटलेल्या ऐकून आमच्याकडे चोर आले असावेत असा समज होऊन ' चोर, चोर, अरे कोई आओ कोई आओ ' असें ते ओरडूं लागले. ( ते स्वतः मात्र आले नाहींत.) त्यांनीं ओरडून आळींतील आणखी कांहीं लोकांना उठविलें आणि त्यांनीं ओरडून मग राहिलेल्या लोकांना जागें केलें.

इकडे श्रीकांतनें दार ठोठावलेलें ऐकून आईनें तें उघडतांच टॉमी तडक आंत घुसला व या सर्व आरडाओरडीस पाहुणा आलेला विनूच कारणीभूत असला पाहिजे असा समज होऊन तो विनूच्या अंगावर धांवून गेला. त्याला आवरतां आवरतां श्रीकांतच्या नाकीं नऊ आले. 'अरे, त्यांच्याकडे पहा कुणी. अरे ते मरतील रे ' असें आई अजून ओरडतच होती. ती हें आपल्याबद्दलच बोलत असावी असा माझा व विनूचा समज होऊन ' आम्ही ठीक आहोंत ' असें आम्ही तिला ओरडून सांगूं लागलों.

या सर्व ओरडीनें अखेरीस बाबांना जाग आली. ' काय गडबड आहे ' तें पाहण्यासाठीं त्यांनीं दार उघडलें. ते ठीक असल्याचें पाहून आईचा जीव भांड्यांत पडला. एकंदर गोंधळाचें स्पष्टीकरण होण्यास व आमच्या घरांत चोरबीर शिरलेले नाहींत हें लोकांना समजावून सांगण्यांत बराच वेळ गेला. ' काय शिंची कटकट आहे. खून नेहीं, कांहीं नाहीं. उगीऽच आरडाओरडा. ' असें कांहींतरी पुटपुटत बाबा परत आपल्या खोलींत ( म्हणजे आजोबांच्या खोलींत ) निघून गेले. ते जातांना 'तरी मी तुम्हांला सांगत होतें. तुमचं मेलं आपलं कांहींतरीच' असें कांहींतरी आई म्हणालीच.

सकाळीं चहा पितांना रात्रीच्या प्रकाराबद्दल आम्हीं एक चकार शब्दही काढला नाहीं ' तरी बरं, तुमचे आजोबा हा गोंधळ पाहायला इथें नव्हते ' असें कांहींतरी आई म्हणाली.

या गोष्टीला आतां पुष्कळ दिवस होऊन गेले. पण त्या दिवसाचा उल्लेख ' आजोबांचा पलंग कोसळला तेव्हां–' असाच आम्ही अजून करतों.

( आधारित )

## आतुरता–

हत्तीच्या सोंडेसारख्या मांड्या असलेली ही सुंदरी प्राणाहूनही प्रिय अशा जिवलगास भेटावयास भररात्रीं निघाली आहे. या रात्रीच्या अंधारांत तिला भीती मुळींच वाटत नाहीं. कारण आपलें धनुष्य सज्ज केलेला मदन तिला सोबत करीत तिच्या बरोबर चालला आहे.

—अमरु शतक








*दुसऱ्यांच्या मृत्यूची चाहूल मरणा अगोदर त्याला कळत होती. कित्येकांचा मृत्यु त्याने स्वतःच्या उघड्या डोळ्यांनीं पाहिला. पण....एके दिवशीं त्याला स्वतःचाच मृत्यु स्वतःभोंवती रिंगण घालतांना दिसला. आणि अकस्मात जें घडलें....!*






**रविवारचा** दिवस असल्यामुळें मी आळसावलो होतो. बाहेरच्या प्रशस्त हॉलमधील मऊमऊ कोचावर विसावलो होतो. सुस्तावलो होतो. केवळ जांभया देत पडलो होतो...अगदीं सहजपणें !...दारावरची कॉलबेल वाजली...मी पुरा वैतागलो. रविवारचा एक दिवसही मला आराम मिळूं नये अशी या माणसांची इच्छा असते. मला तसं पाहिलं तर अनेक मित्र आहेत, मला माणसें आवडतात, चारचौघांशी ओळख असावी, करावी हा माझा आवडता छंद आहे—पण जळूप्रमाणें चिकटणारी माणसें मला आवडत नाहींत, खपत नाहींत. दररोज मी ऑफिसमधून येण्याच्या आधींच घरीं माणसांचे थवे बसलेले असतात... त्या सर्वांना चहापाणी देऊन मी वाटेला लावतो. पण रविवारीही हे लोक मला विश्रांति देत नाहींत...पुन्हा कॉलबेल वाजली. मी धडपडत उठलो आणि पाय न वाजवतां आंत गेलो. बाबूला सांगितलं 'बाबू, कोणीतरी बाहेर आलं आहे. साहेब बाहेर गेले आहेत म्हणून सांग.' आमचा बाबूही चांगलाच तयार झाला आहे माझ्या तालमींत. मी आंतल्या खोलींत दबा धरून बसलो होतो...

'साहेब बाहेर गेले आहेत—'

'होय का ? असूं दे. जरा बसतो मी—' मला आवाज ओळखीचा वाटला...मी आठवूं लागलो तरी नक्की कोण आलं असावं याबद्दल मला कल्पना येत नव्हती...पुन्हा बोलण्याचा आवाज आला...

'पण साहेब आतांच बाहेर गेले आहेत. चांगले दोन तास तरी लागतील परत यायला—' बाबू पवित्रे टाकत होता.

नंतर त्या माणसाच्या हंसण्याचा आवाज आला...'हें बघ फार हुषार आहेस तूं...असंच असावं गडीमाणसानं...आंत जा आणि तुझ्या त्या साहेबाला सांग बाहेर ये, मला फसवतोय लेकाचा...अरे त्याच्या बारशाचं जेवलोंय मी—' आतां मात्र मी आवाज चांगलाच ओळखला...आमचे दोस्त भगवंतराव आले होते.

'माफ करा भगवंतराव...आमच्या बाबूनें तुम्हांला ओळखलं नाहीं आणि आज बरेच दिवसांनीं येणं केलं महाराजांनीं...वाटलं विसरले असाल आपल्या या पामर मित्राला—

भगवंतराव यावर कांहींच बोललें नाहींत...नुसते हंसले, अर्थपूर्ण हंसले. भगवंतरावांच्या आणि माझ्या गप्पा सुरू झाल्या. तसं म्हटलं तर

अरुण अनंत बर्वे

मी भगवंतरावांपेक्षों आठदहा वर्षांनीं लहान. पण तरीही आमची दोस्ती होती. ' आज म्हटलं जाऊन यावं तुझ्याकडे...रविवार आहे. नाहींतर कधीं भेट होणार तुझ्यासारख्या मोठ्या माणसाची...आणि तसं कामही आहे म्हणा ...जरा लवकर आटप. असा आळशासारखा बसू नकोस. आपल्याला बाहर जायचें आहे—'

' कोठें जायचंय ?'

' माझ्या एका मित्राची तुझ्याशीं ओळख करून द्यावी म्हणतोय. गेल्या रविवारी त्याला सांगून आलोय मी तसं..तुला आणण्याचें कबूल केलं आहे मी त्याच्याजवळ. आज आपणाला गेलें पाहिजे...चांगला उमदा प्राणी आहे तो...अगदीं दिलदार तुझ्यासारखाच— '

मीही जरा सुखावलो. भगवंतरावांनीं माझ्या दिलदारपणाची मला सुखद जाणीव करून दिली होती.

...आम्ही दोघे बाहेर पडलो. भगवंतराव मला त्यांच्या या मित्राविषयीं सांगत होते... त्यांच्या या मित्राचें नांव श्रीरंगपंत रांगणेकर एका मोठ्या फर्ममध्यें बड्या जागेवर आहे... स्वतःचा मोठा ब्लॉक आहे...लहानशी गाडी, तरूण सुंदर पत्नी आणि दोनच मुलं...चांगला उमदा, दिलदार प्राणी, ओळख करून घेण्याच्यां लायकीचा...ओळखीचा थोडाबहूत फायदा होण्यासारखा...माझी उत्सुकता वाढली. या माणसाला भेटावें, त्याच्याशीं मैत्री जोडावी, झालंच तर त्याला आपल्याकडे चहाला बोलावं असं वाटूं लागलं...

...आम्ही दोघे त्यांच्या घराशीं येऊन पोहोंचलों...बागेंत काम करीत असलेल्या माळ्याला भगवंतरावांनीं विचारलें; ' श्रीरगपंत आहेत का रे ? ' माळ्यानें भगवंतरावांना ओळखलें असावें किंवा तो आमच्या बाबूइतका हुषार नसावा...' आहेत ना— असें म्हणत त्यानें आमच्या अंगावर धांवून येणाऱ्या अल्सेशियनला आवरलें. आम्ही आंत गेलों. स्वतः श्रीरंगपंत पुढें आले...भगवंतरावांनीं कलेलें वर्णन अगदीं योग्य होतें. माणूस मोठा रुबाबदार दिसत होता, साधारण पस्तिशीचा, नाकीडोळीं नीटस, गोरापान, तरतरीत. भगवंतराव त्यांच्या लहान मुलाशीं बोबडं बोलण्यांत गुंग झाले होते...' माधुरी, हे तुझे काका बरं...नमस्कार कर त्यांना...' माधुरीनं आपल्या इवल्याशा हातांनीं मला नमस्कार केला...पोरगी मोठी गोड आणि लाघवी होती. श्रीरंगपंतांशीं ओळख करून देण्याआधीं भगवंतरावांनीं त्यांच्या या छबकडीशीं ओळख करून दिली ही गोष्टही मजेशीर म्हणायची... भगवंतरावांच्याही ही गोष्ट ध्यानांत आली असावी...त्यांनीं श्रीरंगपंताकडे वळून म्हटलं– 'श्रीरंगपंत माफ करा हं...अहो तुमच्याशीं ओळख करून देण्याचें राहूनच गेलं...हा आमचा बाळासाहेब. आमचा जुना दोस्त. इंजिनियर आहे. आणि बरं कां बाळासाहेब हे आमचे श्रीरंगपंत. तुझ्यासारखेंच हेही आम्हांला जवळचे... ××× कंपनीत बिझिनेस एक्झिक्यूटिव्ह आहेत बर—' मीही या ओळखीनं खूष झालों...औपचारिकपणें मी श्रीरंगपंतांचा हात हातांत घेतला आणि म्हणालों— ' ग्लॅड टू मीट यू श्रीरंगराव–', 'आय टू–' श्रीरंगपंतांनीं म्हटलें...

दोन एकाच आवडीचीं, एकाच रुबाबाचीं अगर एकाच पातळीचीं माणसें एकमेकाला भेटली म्हणजे त्यांचं जमायला वेळ लागत नाहीं. श्रीरंगपंत आणि मी बोलत होतो. गाडी, बंगला यांसारखे विषय आमच्या त्या मोजक्या पण मोकळ्या संभाषणांत सहजपणें येत होते... भगवंतराव बाजूला एकटे बसले होते...स्थितप्रज्ञाप्रमाणें आम्हां दोघांकडे बघत होते... चालू असलेल्या संभाषणांत अडथळा न आणतां ऐकत होते...पंधरावीस मिनिटें आम्ही गप्पा मारल्या आणि श्रीरंगपंत आंत उठून गेले, बहुतेक चहा सांगावयाला गेले असावें...ते आंत गेले आहेत असें पाहून भगवंतराव उठले, माझ्याजवळ सरकले आणि घाईघाईत म्हणाले– ' बाळासाहेब मी जातो...मला गेलं पाहिजे. अधिक वेळ थांबणें मला शक्य नाहीं, तुही माझ्या पाठोपाठ चल...फार वेळ बसूं नकोस, लवकर बाहेर पड–' मला आश्चर्य वाटलं. चांगले तासदीडतास गप्पा मारण्याकरितां आम्ही आलों होतो...मुद्दाम भगवंतरावांनीं मला येथें आणलें होतें आणि आतां केवळ पंधरा मिनिटें झाली नाहीं तोच मला तेथून निघायला सांगत होते...बाहेर पडायला भाग पाडीत होते. मला समजेनासें झालें–म्हणजे ? भगवंतराव अहो असं काय करतां ? आपण आतांच आलों... निदान अजून कांहीं वेळ तरी बसूं या. श्रीरंगपंतही आंत गेले आहेत–' ' नाहीं, ते शक्य नाहीं...मी जातो...बाहेर तुझी वाट बघत उभा आहे मी–' एवढेंच म्हणून भगवंतराव तेथून सटकले आणि श्रीरंगपंत बाहेर येण्याच्या आंत दिसेनासेही झाले...माझी स्थिति चमत्कारिक झाली. ' हो बाळासाहेब, सॉरी हं...बाहेर बसवून ठेवलं तुम्हांला मी...जरा आंत गेलो होतो...अरे पण भगवंतराव कोठें गेलें ? ' श्रीरंगपंत बाहेर येत म्हणाले. मी पुरता ओशाळलो...कांहींतरी सांगणे अरादीं जरूर होतेंच म्हणून केवळ विचारलेल्या प्रश्नाला उत्तर द्यावें एवढ्याकरितां मी म्हणालो–भगवंतराव घरीं गेले–' ' घरी ? मला न सांगतां... पण का ? ' श्रीरंगपंतांनीं विचारलें–' त्याचं असं झालं, श्रीरंगपंत, भगवंतरावाची मुलगी आली होती...कांहींतरी घरीं काम आहे... लवकर चला एवढेंच ती म्हणाली. म्हणून भगवंतराव घाईनें गेले...' ज्याच्याशीं पुरती ओळखही झाली नाहीं अशा माणसाशीं खोटं बोलावं लागत आहे याचं मला दुःख झालं... जातांना भगवंतरावांनीं मलाही तेथून लवकर निघण्यांस सांगितलें होतें याची आठवण झाली. माझी वाट पहात ते रस्त्यावर उभे रहाणार होते...मी पांच–दहा मिनिटें गप्पा मारल्या आणि म्हणालो–' श्रीरंगपंत मीही जातो. पुन्हा कधींतरी जरूर येईन–' ' अहो, पण निदान चहा तरी घेऊन जा–' श्रीरंगपंत म्हणाले. 'नको, पुन्हा अवश्य येईन. श्रीरंगराव भगवानरावांच्या घरीं जाऊन येतो. त्यांची मुलगी आली होती. बघून आले पाहिजे मला...जातो मी–' मी असें म्हटल्यावर मला अडवणें श्रीरंगपंतांना शक्य नव्हतें...मी त्याचा निरोप घेतला आणि रस्त्यावर आलों...

श्रीरंगपंतांकडून बाहेर पडतांना मला वाईट वाटत होतं. औपचारिकपणा सोडून, सभ्य माणसाला न पटेल असें काहींतरी आपण केलं आहे याची जाणीव माझ्या मनाला होत होती. सहज प्रथमच ओळखीनं मी तसा वागलो याबद्दल श्रीरंगपंतांनाही चमत्कारिक वाटलं असेल असं मला वाटूं लागलं...तेथून बाहेर पडतांना कससचं होत होतं...मग भगवंतरावांनीहि असं लगेच बाहेर कां पडावें ? ओळखीला कोठें सुरुवातीच सुरवात झाली आहे अशा वेळीं मला बाहेर पडण्यास कां सांगावें...मला कांहींच सुचेनासं झालं. मी थोडाफार वैतागलो... नाक्यावर भगवंतराव उभे होते. मला पाहिल्यावर कोणत्यातरी मोठ्या संकटातून मी सुटून आलों आहे अशा अर्थाचा त्यांनीं चेहरा केला ...मी गोंधळत होतो, विचारांच्या गुंतवळ्यात गुंडाळला जात होतो...मला कांहीं समजेनासें झालें. मी जरा त्रासिकपणें म्हणालो—' या भगवंतराव बरी लाज काढलीत तुम्ही आज आमची—'

अनुक्रमणिका

'नाहीं तुला कळायचं तें—'

'म्हणजे ?—'

'म्हणजे काय ? आपण तेथून लवकरच निघून येणं योग्य होतं एवढंच—'

'पण कां ?'

'खरा आहे प्रश्न तुझा. एका माझ्या ओळखीच्या माणसाकडे मी तुला घेऊन जातो. तुझी ओळख करून देण्यासाठीं...चांगले तास दीडतास बसण्याच्या इराद्यानें आपण जातो आणि केवळ थोड्याच वेळांत मी तेथून सटकतो...तेही त्या माणसाच्या नकळत, त्याच्या नजरेआड !...आणि तुलाही तेथून बाहेर पडण्यास भाग पाडतो. सगळं विलक्षण आहे हें... पटलं मला. सभ्य माणसाला न शोभणारं आहे हेही मला पटतं...पण माझा नाईलाज आहे बाळासाहेब...नाइलाज आहे.' भगवंतरावांना कांहींतरी सांगावसें वाटत होतं. पण तें सांगताना त्यांचा निश्चय होत नव्हता...

'भगवंतराव म्हणजे तुम्हाला तें पटतं कीं तुमचें वागणं विलक्षण होतं...मग तुम्ही असें कां वागलात ? तेथून कां निघालात ?—' 'सांगतो...श्रीरंगपंतांकडे तूं नीट पाहिलेस ?'

'हो...पण का ?'

'कसा वाटला तो ?'

'चांगले रुबाबदार, खानदानी आणि दिलदार वाटलें मला श्रीरंगपंत...आणि तुम्हीहि नव्हतं का मला पूर्वी सांगितलं कीं श्रीरंगपंत लाखात एक आहेत, उमदा प्राणी आहे—?

'हो...पण त्याच्याकडे तू नीट पहात होतास ? त्याच्या सर्वांगाकडे ? त्याच्या डोळ्यांत ? त्याच्या...?'

'समजलं नाहीं मला भगवंतराव...पण तुम्ही असं का विचारता ?'

'तूं नीट पाहिलं असतंस तर तुलाही पटलं असतं... अर्थात ते तुला शक्य नाहीं... मला शक्य आहे म्हणूनच—

'नीट बोला भगवंतराव—'

'श्रीरंगपंतांच्या डोळ्यांत आज दिसणारी चमक निराळी होती.बाळासाहेब. खानदानीपणा पुरेपूर उपभोगल्याचें प्रतिबिंब त्यांत होतं. श्रीमंतीची झांक त्यांत होती. मनाच्या मोठेपणाची झालर तेथें होती. पण त्याचबरोबर न चुकणारं... हो न चुकणारं दुःख त्यांत दिसत होतं.. पुढें येणाऱ्या संकटाचे धागे त्यांत विलगले आहेत...आणि ते सर्व मला दिसलं...

'म्हणजे ?—'

'म्हणजे ?— 'म्हणजे श्रीरंगपंतांच्याभोंवतीं पण नकोच. मी बोलूं नये तें बोलायला लावतो आहेस बाळासाहेब तू मला... मला कळत आहे पण बोलवत नाहीं.. दिसत आहे पण दाखवता येत नाहीं... 'समजलं आहे पण सांगतां येत नाहीं. तरी तुला सांगणें जरूर आहे, ऐकण्याची तयारी आहे तुझी ?—'

'हो. पुरतं बोला भगवंतराव—काय म्हणायचं आहे तुम्हाला ?'

'कसं सांगूं तुला बाळासाहेब ? तुला तें सहन करवणार नाहीं.

'सांगा भगवंतराव...कांहीं एक लपवूं नका—'

'तर ऐक... श्रीरंगपंतांभोंवतीं...त्याच्या अगदीं जवळ मृत्यु फेर धरून नाचतो आहे.. आजपासून सातव्या दिवशीं... आणि म्हणून मी त्याला टाळतो आहे—'

'काय ?—' मी अक्षरशः किंचाळून ओरडलो. भगवंतरावांबद्दल मला.भीतियुक्त आदर वाटूं लागला... श्रीरंगपंतांबद्दल कींव वाटूं लागली.

'भगवंतराव पण तें तुम्हाला समजलं ?—'

'अहो मला समजलं म्हणूनच मी तेथून बाहेर पडलों. तुला कळलं नाहीं म्हणून तूं तेथें बसून राहिलास. मला खुळ्यांत काढलंस... पण माझ्याबरोबर तुही तेथून बाहेर पडावं असं मला वाटलं...त्या मृत्यूमुळें... त्या न चुकणाऱ्या संकटामुळें—

'पण हें तुम्हांला कसं समजलें ?

'आज अनेक दिवस... अनेक वर्षं ही गोष्ट मला समजते... दुसऱ्याचा मृत्यु मी ओळखतो, आणि म्हणूनच मी तेथून पळ काढतो. बाळासाहेब तेथें रहाणें मला शक्य नसतें. मन तयार नसतें...वाटतं येथें धोका आहे... येथें कांहींतरी अशुभ आहे...नक्की घडणारें आहे, न चुकणारे आहे, शक्तीच्या बाहेरचें आहे, आवरतां न येण्याजोगं कांहीं तरी वाईट घडणार आहे... आणि असं वाटूं लागलं कीं माझं मन बावरतें, गोंधळतें आणि मी तेथून सटकतो, पळ काढतो बाळासाहेब. आज तू मला विचारलंस म्हणून मी सर्व सांगून टाकलं...नाहींतर ते कोणालाही समजणें शक्य नाहीं... तुलाही नव्हतं.... कोणाजवळ बोलूं नकोस हं... भगवंतरावांनीं मला सांगितलें.

भगवंतरावांबद्दल मला आश्चर्य वाटूं लागलं. आज अनेक वर्षें ते माझे मित्र आहेत. पण ही शक्ति त्यांच्याजवळ असेल अशी पुसटशी कल्पनाही मला नव्हती. किंबहुना आजपर्यंत एकही प्रसंग घडला नाहीं कीं त्यामुळें या गोष्टीची जाणीव व्हावी. श्रीरंगपंतांचा मृत्यु समजल्यामुळें एक प्रकारची भीति वाटून ते तेथून सटकले होते, हे खरें. पण तरीही श्रीरंगपंतांबद्दल वाटणारी सहानुभूती, प्रेम त्यांच्या शब्दांतून व्यक्त होत होतं. सारं सांगतांना ते घामजले होते. त्यांचे डोळे पाणावले होते. चेहरा केविलवाणा झाला होता. माझ्या मनांतहि आतां भीति उत्पन्न होत होती...

त्या दिवसानंतर एक दिवस श्रीरंगपंत मला रस्त्यावर भेटले. दोनच दिवसांपूर्वी त्यांची आणि माझी ओळख करून देण्यांत आली होती...त्यांनीं माझा हात हातांत घेतला. मैत्रीचें प्रतीक म्हणून माझा खांदा थुसळला आणि दिलखुलासपणें तो दिलदार प्राणी म्हणाला— 'काय बाळासाहेब...आमचे नवीन दोस्त ! कसं काय चाललंय ? एवढें बोलून त्यांनीं त्यांचेबरोबर असलेल्या त्यांच्या सौभाग्यवतीची ओळख करून दिली. मी औपचारिकपणें नमस्कार केला...श्रीरंगपंतांची पत्नीही त्यांना शोभेल अशीचें होती... किंचित् स्थूलपणें झुकणारा तिचा बांधा आणि सतेज गव्हाळी रंग श्रीरंगपंतांच्या खानदानीपणाला शोभा आणणारा मला वाटला. तरी त्यावेळीं मला तिच्याबद्दल अचानक कींव वाटूं लागली. तिनें हंसून मला नमस्कार केला पण तोही मला भयंकर वाटला...क्षणभर वाटलं हिला सांगावं 'अशी हंसू नकोस... तुझं हें हंसणं मला सहन होत नाहीं...या हास्याच्या ठिकाणीं थोड्याच दिवसांत मला—'

मीही प्रति नमस्कार केला...तिच्या पांढऱ्या शुभ्र कपाळावरचें सौभाग्याचें लक्षण पुसून जात आहे असं मला वाटलं...जितक्या सहजपणें श्रीरंगपंतांनीं माझा हात हातांत घेतला होता तितक्याच सहजतेनें मी तो सोडवून घेतला...त्यांच्या हाताचा स्पर्श मला कसाचाच वाटला...मी तेथून सटकलो. असेंच आणखी चार दिवस गेले ...गेल्या रविवारी श्रीरंगपंतांशीं माझी ओळख करून देण्यांत आली होती...आणि या रविवारी







अनुक्रमणिका

मला कांहीं बरें वाईट ऐकावं लागणार होतं–मन कशांत रमत नव्हतं...मी सुन्नपणें विचार करीत बसलों होतों..गेला आठवडाभर चाललेली माझी घालमेल घरांतल्या मंडळींच्या नजरेंतून सुटणारी नव्हती...आजही मी कोचावर विसावलों होतो; पण आळसावलों नव्हतो...कॉलबेल वाजल्याचा आवाज झाला म्हणून मी दरवाजा उघडला. एक वाऱ्याची झुळूक फक्त आंत शिरली आणि माझें सर्वांग थरारून गेलें. केवळ भास झाला होता मला...कॉलबेल वाजलेली नव्हती...पुन्हां कॉलबेलचा आवाज झाला...आतां भास नव्हता...मी दरवाजा उघडण्यासाठीं पुढें झालों...पण तरीहि धीर होत नव्हता...पुन्हां कॉलबेल वाजली...मी धांवतच पुढें गेलों आणि दरवाजा उघडला... मला बघवेना...भगवंतराव दारांत उभे होते. कांपत होते...' बाळासाहेब कळलं तुला ?–' ' काय भगवंतराव ? आंत या–' ' मी तुला म्हणालों होतो ना...अरे वेड्या असा बघतोस काय ?...आपला श्रीरंगपंत गेला...' हे सर्व ते घाईंतघाईंत बोलले. हे सर्व सांगतांना ते घाबरेबुबरे झाले होते...एखाद्या वेड्यासारखे बघत होते. त्यांना तें दुःख सहन झालें नाहीं. त्यांनीं मला अक्षरशः मिठी मारली आणि तो धीरोदात्त मुसमुसून प्राणी रडूं लागलं.. ' काय झालें हें, बाळासाहेब...आपला श्रीरंगपंत गेला. हृदयविकारानें गेला...आज सकाळीं... सांगितलें नव्हतें मी तुला, असं कांहीं होणार म्हणून–' पुन्हां ते रडूं लागले. –मीहि या बातमीनें चरकलों. भगवंतरावांनीं मला आठवड्यापूर्वीच या प्रसंगाची जाणीव करून दिली होती...मला दुःख वाटलें. पण त्यापेक्षांही भगवंतरावांबद्दल मला उत्सुकता वाटूं लागली. त्यांच्या ठिकाणीं असलेल्या या अद्‌भुत शक्तिबद्दल मी विचार करूं लागलों.

यानंतर भगवंतरावांकडे माझें जाणेंयेणें जास्ती वाढूं लागलें. त्यांच्याजवळ असलेल्या या शक्तीनें मी ओढला जाऊं लागलों. त्यांच्या बरोबर मी जास्त वेळ घालवूं लागलों. भगवंतराव हे सर्व समजून चुकलें होते. एखाद्या माणसाचा मृत्यु त्यांनीं आठवडाभर आधीं सांगावा आणि पुढें घडणाऱ्या या प्रसंगाचा मी तलास लावावा. आठ दिवसांनीं भगवंतरावांकडे येऊन त्यांनीं केलेलें भाकित खरें झाल्याचें त्यांना सांगावें असें चाललें होतें.

--एक दिवस मी आणि भगवंतराव चाललों होतों. चालतां चालतां भगवंतराव मध्येंच थांबले...त्यांनीं पाठ फिरविली आणि मला जरा बाजूला नेऊन ते म्हणाले–' बाळासाहेब तो मनुष्य पाहिलाय ?'–'कोणता भगवंतराव ?' ' अरे तो समोरून येत आहे तो—'

' पाहिला ना. का भगवंतराव कांहीं विशेष ? '

' विशेष काहीं नाहीं. तो आज निराळाच दिसतो आहे—'

भगवंतरावांना काय म्हणायचें आहे तें मला कळलें. मीही उत्सुक होतोच. पण भगवंतरावांना मात्र त्या माणसाबद्दलहि गहींवरून आलें.

' पण भगवंतराव तुमच्या ओळखीचा आहे तो ?—'

' नाहीं...आजच मी त्याला बघतोय...तरी तो आज खासच निराळा दिसतोय...अगदीं निराळा–चुकणार नाहीं विधिलिखित आहे–' हें सांगताना त्यांचा कंठ दाटून आला.

' पण त्याचं नांव ? पत्ता ? '

' मला माहीत नाहीं...काहींसुद्धां माहीत नाहीं मला त्याच्याबद्दल...' भगवंतराव कळवळून बोलत होते...माझी उत्सुकता वाढली. मी त्या माणसाचा पत्ता काढला. त्याच्या नांवाचा शोध लावला आणि आठ दिवस त्याच्या जाण्यायेण्यावर, वागण्यावर लक्ष ठेवलें...ज्या गोष्टीसाठीं मी या कामांत इतकें लक्ष घालत होतो ती गोष्ट घडणारी होती, न चुकणारी होती यावद्दल मला खात्री होती...जें घडायचें तें घडलें...भगवंतराव आधिकच दुःखी बनूं लागलें...

--अनेक छंद माणसाला असतात. पण मला लागलेला हा छंद निराळा होता. ही सवय विचित्र होती, हिडीस होती. जीवघेणी होती. पण तरीही मी त्याकडे ओढला जात होतो. आणि न रुचणारें, न शोभणारें, न सुखवणारे अनुभव घेत होतो.

भगवंतरावांकडे मी जात–येत होतोंच. भगवंतरावही माझ्याकडे येत. दिवस चालले होते. एक दिवस नेहमीप्रमाणें मी भगवंतरावांकडे गेलो. ते घरीं नसल्याचें कळलें...कोठेंतरी बाहेर गेले. असावेत असें समजून मी घरीं आलों... त्यानंतर दोन दिवसांत भगवंतरावही माझ्याकडे आले नाहींत...त्यांना भेटण्यासाठीं म्हणून मी बाहेर पडलो...वाटेंत भगवंतरावराव भेटले. ' काय भगवंतराव अहो कोठें लपून होतां दोन दिवस ? अगदीं तोंडही दाखवलं नाहींत–' मी थट्टेच्या स्वरांत त्यांना विचारलं. 'नाहीं, बाळासाहेब जरा घाईत होतो, आजही आहे. पुन्हा कधीतरी भेटूं. मीच येईन आज संध्याकाळीं तुझ्याकडे–' एवढेंच बोलून ते निघून गेले. मला माहीत होतं कीं आजकाल भगवंतराव मुलीच्या लग्नाच्या घाईत होते. वधुपित्याची जी तारांबळ उडावी ती त्यांची उडाली असावी. मी घरी आलों....संध्याकाळी भगवंतराव आले नाहींत, मला आश्चर्य वाटलें. कारण तसा तो शिस्तप्रिय माणूस. आणखी दोन दिवस ते भेटले नाहींत. मीही कामाच्या घाईत होतो...एक दिवस पुन्हा ते वाटेंत भेटले...पाठमोरे उभे होते...अगदीं एकटे...काहींतरी बघत, काहींतरी विचार करीत. स्वतःशींच. मी त्यांच्या पाठीवर थाप मारीत म्हणालो—' अहो मिस्टर...म्हणजे कमाल आहे बुवा. आम्ही वाट पहात घरीं बसायचं आणि तुम्ही खुशाल–' भगवंतराव चपापले. ' कोण बाळासाहेब ? ' त्यांनी चमकून पहात विचारलें...'असं कर, उद्यां येतोच बघ. अगदीं यावेळीं...नक्की, हं. पण आतां गेलं पाहिजे मला. अगदीं वेळ नाहीं–' ते कांहीं नाहीं. आतां मी सोडणार नाहीं भगवंतराव तुम्हांला. निदान कोपऱ्यावरच्या इराण्याकडे चहा घेऊं– ' मी त्यांना खेंचतच म्हणालों. भगवंतरावांनीं माझ्या हातांतून सुटका करून घेतली आणि मला कळायच्या आंतच ते झपाझप पावलें टाकीत दिसेनासेही झाले...मी क्षणभर गुंग झालों...अगदीं शांतपणें. मघाशीं उभा असलेला हा माणूस मी पाठीवर थाप मारतांच चपापला. आपण घाईत असल्याचें भासवूं लागला...नाटक करूं लागला. माझ्याकडे निदान एक दिवसाआड येऊन तासन्‌तास गप्पा मारणारा हा प्राणी पांच मिनिटें चहा पिण्यासही वेळ नसल्याचा खोटा बहाणा करूं लागला. मला समजेनासें झालें. एवढं काय काम आहे भगवंतरावांना ? माझ्यापासून लपवून ठेवण्याइतकें खाजगी ? क्षणाचाही वेळ रिकामा मिळूं नये इतकें महत्वाचें. माझी आणि भगवंतरावांची आज अनेक वर्षांची मैत्री आहे. पण यापूर्वी ते असं कधीं वागलें नव्हतें. मनाला न पटणारं असं त्यांनीं कधींच काहींही केलं नव्हतं. माझं मन विचार करूं लागलं...नुसतीं झपाझप पावलें टाकीत जाणाऱ्या भगवंतरावांच्या पाठमोऱ्या आकृतीकडे मी बघत बसलो. भगवंतराव दिसेनासे होईपर्यंत... मीं घरीं जाण्यासाठीं निघालों. मनांत गोंधळ उडत होता. घरीं आलों.

घरांतल्या गोष्टींशीं रममाण होण्याचा मी प्रयत्न करीत होतो. पण तें मला शक्य नव्हतें. कबूल करूनही पुन्हां भगवंतराव आले नाहींत... गेल्या पांचसहा दिवसांत ते मला दोनदां तीनदां भेटले. पण प्रत्येक वेळीं ते कामांत असल्याचें दाखवीत होते प्रत्येकवेळीं मी बोलंण्यांचा प्रयत्न केला होता. पण त्यांनाच वेळ नव्हता. एक दोनदां त्यांच्या घरींही गेलों होतों पण ते घरीं नसल्यामुळें तसाच परत आलों होतों... बहुधा ते मला टाळीत होते. चुकवत होते... पण मला कां तें टाळत होते ? या विचारानें माझें सर्व शरीर शहारलें. मन बावरलें, ...श्रीरगपंतांना भगवंतरावांनीं असंच टाळलं होतं. रस्त्यावरील अनोळखी माणसाकडे पाहून अशीच पाठ फिरविली होती. माझं मन सुन्न झालं. आतां मात्र मला सर्व समजून चुकलें होतें. भगवंतराव मला टाळीत होते तर. एका भयंकर विचारांतच मी घरीं आलों...

...सध्याकाळीं मी पुन्हां बाहेर पडलों. मग भगवंतराव भेटले नाहींत...तसाच घरीं आलों. घरात पाऊल टाकतांच मला कळलं कीं भगवंतरावांची मुलगी येऊन गेली होती...मला त्यांनीं लवकर बोलाविलें आहे असें सांगून ती गेली होती. मी खूप झालों. हा माझा विजय होता. मला टाळणार भगवंतराव आज मला भेटण्यासाठीं तयार झाले होते. त्यांनीं खास निरोप पाठविला होता...मला आनंद झाला. गवसलेलें कांहीतरी मिळालें असल्यासारखें मला वाटत होतें. मी तसाच धांवत बाहेर पडलों. भगवंतरावांकडे गेलों. नेहमी बाहेरच्या हॉलमध्यें भगवंतराव बसलेले असत किंवा बागेंत काम करीत असतांना दिसत. आज तसे ते दिसले नाहींत. त्यांचा मोठा मुलगा बाहेर बसला होता. त्यानें मला आंत नेलें. भगवंतराव त्यांच्या झोपण्याच्या खोलींत कॉटवर पडले होते...चेहरा भकास दिसत होता...

'ये बाळासाहेब—' भगवंतरावांनीं मला बसायला सांगितलें. बाकीच्या मंडळीला त्यांनीं खुणेनेंच बाहेर जाण्यास सांगितलें.

'आश्चर्य वाटलं असेल नाहीं तुला. आज मी तुला बोलावून घेतलं याबद्दल ?—

'असं का बोलतां भगवंतराव ? आश्चर्य कसलं वाटायचं त्यांत ?— '

'तसं लपवूं नकोस. चेहराच सांगतोय बाळासाहेब. गेल्या कांहीं दिवसांत मी तुला भेटलों नाहीं, किंबहुना भेटलों तरी...हो. म्हणूनच तुझा चेहरा असा खरं ना ? ' खरं म्हणजे भगवंतराव माझ्या मनांतलं बोलत होते.

'पण माझ्या या वागण्याचा तूं भलताच अर्थ लावून घेऊं नकोस बाळासाहेब—'

'म्हणजे भगवंतराव ? मला समजलं नाहीं तुम्हाला काय म्हणायचें आहे तें— '

'तुला समजलं आहे बाळासाहेब. मी तुला टाळत होतो त्यावेळीं तुला वाटलं असेल... बोल खरं ना ?—

'नाहीं भगवंतराव, तसं मला वाटलं नाहीं... आणि कां वाटावं ?' मी उगाचच खोटं बोलत होतो.

'हें बघ खोटं बोलण्याचा प्रयत्न करूं नकोस. तुझा चेहरा उतरला आहे. घाबरला आहे. तो कां ? कर कबूल कर. बाळासाहेब मी तुला टाळत होतो तेव्हां तुला वाटलं जसं मी श्रीरंगपंताला टाळलं, जसं रस्त्यावरल्या त्या माणसाला पहाण्याचंही टाळल— '

'हो भगवतराव खरं आहे तुमचं. तसंच मला वाटलं—' मी सर्व बोलून गेलों. मला रहावलं नाहीं.

'वेडा आहेस झालं. वेड्या मी तुला टाळत होतो तो त्याच्याकरतां नव्हे— ' 'तुला आठवतं, मी तुला म्हणालों होतों, बाळासाहेब, कीं अशा माणसांपासून दूर रहा...ज्यांचे बरेंवाईट कळलें आहे त्या माणसांपासून दूर रहा. बाळासाहेब, अशा माणसांपासून दूर रहा—' भगवंतराव पुढचें वाक्य बोलूं शकलें नाहींत. त्याना सांगावसं वाटत होतं. पण ते त्यांना शक्य झालं नाहीं. कधींच होणार नव्हतं.

●●●

---

**एकत्र गुंफून......**

...पान १७ वरून

उत्तर म्हणून तूं दोन कढत अश्रु माझ्या तळहातावर ठेवलेस आणि पाण्यांत चांदणं विरघळावं तशी माझ्यांत विरघळून गेलीस. तुझ्या हळव्या भावनेला मी यावेळींही साथ देऊं शकलो नव्हतों...

विरल्या भूतकाळाचीं तीं पावलं अजून ऐकूं येताहेत. ते जुने दिवस अजून डोळयापुढं चालल्यासारखे वाटताहेत. माझ्यासाठीं किती कष्टलीस तूं ? माझ्या मनींच्या सहस्त्र व्यथा तूं तुझ्या उरापोटा वागावल्यास. माझे अश्रू झेललेस. माझें एकटेपणाचें दुःख तूं उराशीं साहलेंस. माझ्या अपेक्षीं तूं नाहलीस...

पण प्राक्तन कसं हलतं बघ. आज या उत्तररात्रीं एक अतृत सांवली होऊन माझ्या पुढं बसली आहेस. स्पर्शापलिकडची शिल्प झाली आहेस. माझ्या जिवाच्या साजणी ! आज केवळ मी बोलतो आहे. आणि तूं ऐकते आहेस. तोच जुना चंद्र क्षितिजावर पिकलेल्या फळासारखा टेकला आहे. तीच चैत्रयामिनी आहे. तेंच जुनं चांदणं क्षीण होत आहे. आणि तोच मी आहे...

'पण हें काय तूं निघालीस कुठं ? बैस ना, जरा...

'नाही हो. मला गेलं पाहिजे. पहिला कोंबडा आरवला. मला गेलंच पाहिजे. तुम्ही निजा आतां. तुम्ही फार शिणला आहांत, तुम्ही निजा, राजन्,...येते मीं...'

'नको उजू, नको जाऊं...'

'असं काय करतां लहान मुलासारखं. मला गेलं पाहिजे...'

'पुन्हां केव्हां भेटशील, उजू...?

'पुन्हां ? कोण जाणें, कोण्या जन्मी आपली भेट होईल. जाते मी. तुम्ही निजा. तुम्ही फार शिणला आहांत... येतें मी, राजू...'

तूं निघून गेलीस. मी धडपडलो. जिवाच्या आकांतानं उघड्या खिडकीपर्यंत धांवलो. पण माझं मीपण मला मिळालं नाहीं. क्षितीजावर पेंगणाऱ्या चंद्राची ठेंच मला लागली. आणि मी भानावर आलों. तूं निघून गेली आहेस. पहाटेच्या मंदावल्या चांदण्यांत नाहीशीं झाली आहेस. विरल्या चांदण्याच्या पावलांनी. आणि त्या क्षीण क्षणीं चांदण्याला एका एकी आग लागली आहे. गुलमोहराच्या झाडासारखं तें रक्त चांदणं भडकून निघालं आहे. या भडकलेल्या चांदण्याच्या डोहांत मी उभा आहे. भविष्याचा अंधार साहण्यास मी बाहू पसरून उभा आहे. पण उज्ज्वला, उजू, एकदांच परत ये ग. मी पोरका आहे. मी तुझ्याशीं लग्न लावीन. उजू, पण एकदाच येऊन जा...

पहांट व्हावी, पहाट होऊं नये अशा तंद्रीत रात्र पुढं सरकतें आहे. रात्रीचं जांभळं वस्त्र विरत चाललं आहे. दूरवर चंद्र पेंगतो आहे. आजच्या शिणलेल्या रात्रीला काठ नाही. पुन्हां एकदां तुझ्यामाझ्या दैवरेषा चुकवून ती पुढं सरकते आहे.

●●●



**तोल...**

...पान ९ वरून

इलाज नाहीं. तुझ्या हें लक्षांत आलेंच असेल !'

'तुझा रोख कळतो मला. पण मला जें वाटलं तें सांगितलं. असल्या संकेतावर विश्वास ठेवण्याचा हा काळ नाहीं !'

'कमा, खरं तर यांत नवल वाटण्यासारखं कांहीं नाहींयू. निसर्गाप्रमाणेंच माणूस वागत असतो. नव्हे, निसर्गाप्रमाणेंच माणसाला वागावें लागतें हें म्हणणें अधिक संयुक्तिक ठरेल. निसर्गाचीं बंधनं माणसाला जखडून टाकतात आणि माणसंहि तीं बंधनं आपणहून स्वीकारतात. नकळत, त्यांच्या इच्छेचा तिथें प्रश्नच नसतो.'

ती त्याचें म्हणणें नीट लक्षपूर्वक ऐकते. तो एकाएकी खुर्चीतून उठतो. बंद केलेल्या खिडक्या उघडतो. बाहेर पाऊस सुरू असतो. वीज चमकून गेल्यानंतर गडगडाट ऐकूं येतो. पहिल्यांदा जोरदार आणि नंतर हळूंहळूं कमी होणारा देवळांतल्या घंट्यांचा आवाज वातावरणांत विरतो तसा. वाऱ्याचा वेग पूर्वीच्या मानानें कमी झालेला असतोः तरी आतांपर्यंत बंद असलेल्या खिडक्यांचीं दारें नव्या उत्साहानें आपल्या मनाला येईल तशीं मागें पुढें होतात. खिडक्यांवरील पडदे वाऱ्यानें फडफडतात आणि पावसाच्या सपकाऱ्यानें भिजून-भिजून खिडक्यांच्या दारांना चिपकूं बघतात.

मघासारखी वीज चमकून जाते. उजेड असूनहि खोली क्षणभर उजळून जाते. क्षणभर कमल आणि सुनीलच्या डोळ्यासमोर अंधारी येते. गडगडाटानंतर बराच वेळ तो आवाज खोलींत घुमत असल्याचा भास होतो.

सुनील अस्वस्थपणें फेऱ्या घालतो. मग खिशांतली सिगारेट काढून तोंडांत धरतो. अलगद्‌शी. लाईटर पेटवून ती पेटवितो. ती पेटवित असतांना लाईटरची कमी अधिक होणारी ज्योत त्याला आवडेनाशी होते. तो जोराचा दम मारून धुराचा लोट ज्योतीवर लोटतो. ती विझते. लाईटर हातांत खेळवीत तो कमलजवळ येतो. म्हणतो—

'अमक्यावेळीं अमूक करायलाच पाहिजे असं कांहीं नाहीं. ते आपोआपच होतं. म्हणजे निसर्ग आपलं काम चोख बजावीत असतो. म्हणूनच जें घडतं तें सहज घडतं असं वाटतं. परंतु त्यामागें निसर्गाची शक्ति असते.'

तो थांबतो. ती त्यांच्यांकडे एकटक पाहते. बोलत कांहीं नाहीं. मग तोच विचारतो—

'कां बोलत नाहींस तूं ?'

'तूं म्हणतोस तें अगदीं खरं आहे. मलाहि तेंच म्हणायचं आहे. माणूस निसर्गाप्रमाणेंच वागत असतो. मी देखील निसर्गाप्रमाणेंच वागते आहे. आणि तूं देखील. फरक इतकाच कीं आपल्या वागण्यामागचा निसर्ग वेगवेगळा आहे. माझी नैसर्गिक प्रवृत्ती ही अशी आहे. तिला आळा घालणं कुणाच्याच हातीं नाहीं. माझ्याहि आणि तुझ्याहि !'

वाऱ्याच्या जबर वेगानं खिडक्यांच्या दोन्हीं बाजू धाड्धाड आदळत असतात. सुनील पुन्हां उठतो आणि दोन्हीं खिडक्यांचीं दारें 'बोल्ट' बसवून पूर्ववत् करतो.

'चुकीचं विधान आहे हें !' सुनील तिच्याजवळ येऊन तिला म्हणतो.

'कशावरून ?'

'तूं वागतेस ती तुझी निसर्ग प्रवृत्ती तूं म्हणतेस. परंतु ती तशी असूनहि तूं तशी, फक्त कांहीं क्षणापुरतीच राहूं शकतेस, मनांत आणलं तर ! मलाहि तुझ्यासारखं बेछूट वागतां येतं. मला बॉल डान्स येतो. इंग्लीश गाणीं गातां येतात. डीन मार्टीनचा हुबेहूब आवाज मीहि काढूं शकतो. रॉक-एन्-रोलचीं नृत्यें मीहि करूं शकतो. चार मुलींच्या घोळक्यांत राहून त्यांना वेडं करणं मलाहि जमेल. नशेंत पागल होऊन हव्या त्या 'सेक्स'ची मजा मलाहि लुटतां येईल. परंतु—'

'हा परंतु कां ?' ती आवाज चढवून विचारते. तो क्षणभर कांही बोलत नाही. तिच निश्चितपणें उत्तरते—'

'म्हणजे तुझ्यांतला, तसं वागवून घेणारा निसर्ग कमी शक्तीचा आहे !'

'तसं नाही. तो तितकाच शक्तिमान आहे, जितका तुला अभिप्रेत आहे. परंतु त्यावर माझ्यांतली नैतिकता मात करते. ती त्यापेक्षां अधिक शक्तिमान आहे. !'

ती पुन्हां आवाजांत निश्चितता आणून म्हणते—

'म्हणजेच ती कमी शक्तिमान आहे !'

'याचा अर्थ तुला कळायला हवा !'

'त्याचा अर्थ मला कळला आहे. माझ्यांत नैतिकता नाहीं, असंच तुला म्हणायचं आहे ना ?'

'निश्चितच. अगदीं बरोबर !' तो ठासून म्हणतो. ती चिडते. चिडूनच म्हणते—

'एवढ्या ठामपणं सांगू नकोस. नैतिकतेच्या कल्पना व्यक्ति तितक्या प्रकृतिप्रमाणें असतात !'

'चूक. साफ चूक !'

'कशावरून ?'

'नैतिकतेच्या कल्पना ह्या तुझ्या किंवा माझ्या मालकीच्या नाहींत. त्या समाजाच्या मालकीच्या आहेत. पूर्वापार चालत आलेल्या रूढ कल्पना, निश्चितच कांहीं टप्प्यानें बदलत असतात; परंतु तो बदल त्या त्या काळाला आवश्यक तेवढाच जुजबी असतो. अंगावर कमींत कमी वस्त्रें परिधान करून स्वतःच्या सौंदर्याची फिरती जाहिरात करण्याची पाश्चात्यांची संस्कृती असेलहि. परंतु ती भारतीयांची खास नाहीं. अंगभर कपडे लेवून समाजांत वावरणारी स्त्रीच भारतीय संस्कृतीची प्रतिनिधी आहे !'

त्याच्या बोलण्याला ती सपाटून हंसते. तें हंसणं सुनीलला अपेक्षित नसतं. पण तो स्वतःला सावरून घेतो. तिला विचारतो—

'तुला एवढं हसायला काय झालं ?'

'कांहीं नाहीं !'

'मग कां हसलीस एवढ्यांदा ?'

'मला तुला एक विचारायचंय् !'

'काय ?'

'तुझं वय काय ?'

'पंचवीस ! कां ?'

'पंचविसाव्या वर्षी माणसानं साठाव्या वर्षाच्या तत्त्वज्ञानाच्या प्राध्यापकासारखं कांहीं बोलूं नये !'

'हीं बंधनं नाहींत. ज्याच्या त्याच्या विचाराच्या कुवतीचा तो प्रश्न आहे.'

परंतु मला हें पटवून सांगतांना माझी काय कुवत आहे हें, नको कां विचारांत घ्यायला ? तुझे विचार मला पचतीलच कशावरून ?'

'प्रयत्न कर ! माणूस जन्मतःच हुशार नसतो. तुझं वय लक्षांत घेतां तूं फार समजूतदार आहेस असं माझं मत आहे !'

'चूक आहे तें !' ती थोडी थांबून म्हणते—'मी समजूतदार नाहीयू. मला जें पचतं तें मी करते !'

'तुझं वय काय ?'

'वीस'

'विसाव्या वर्षी हिंदु स्त्रीनं इतकं आगाऊ असणं आवश्यक आहे काय ?'

'भारतीय तरुणीनं साठाव्या वर्षी असं कांहीं करायला हवं काय ? जेव्हां जें घडायला






इवं तेव्हांच तें घडतं असं तुझं म्हणणं आहे ना ? माझ्या दृष्टीनं तें या वयांत आवश्यक आहे.'

'म्हणजे तुला भारतीय संस्कृतीपेक्षां पाश्चात्य संस्कृती अधिक पचते.'

'हाच याचा अर्थ !' तीहि ठामपणें उत्तरते.

'तुला पॅरिसच्या नाईट क्लबांत 'स्ट्रीप ट्रीज' पद्धतीचीं नृत्यें करायला लावलीं तर तूं आपल्या अंगावरची एक एक वस्त्रें फेडून प्रेक्षकांसमोर संपूर्ण नग्न होशील कां ? तुला हें आवडेल ?'

'पण मी तीं नृत्यें कां करावींत ?'

'म्हणजेच पाश्चात्य संस्कृती तूं संपूर्णपणें पचवूं शकत नाहींस. तूं करतेस ती भ्रष्ट नक्कल आहे. अंधानुकरण आहे. त्यामागें तुझी स्वतःची अशीं मतं नाहींत. त्याला नैतिक अधिष्ठानहि नाहीं.'

'कशावरून ?'

मी तुझ्या इतक्याच शिकलेल्या तुझ्या वयाच्या भारतीय तरुणींशीं तुलना करतो. त्या मला इतक्या आगाऊ दिसत नाहींत. म्हणजे त्यांच्यामागें भारतीय नैतिकता आहे हें इथें अध्याहृत आहे. सुशिक्षितपणाचं प्रदर्शन ह्या असल्या गोष्टीशिवाय होत नाहीं काय ?'

'प्रश्न सुशिक्षितपणाच्या प्रदर्शनाचा नाहीय्!'

'मग तुला तुझ्या या वागणुकींतून यापेक्षां दुसरं काय सांगायचं आहे ? तुझ्यासारख्या सुंदर तरुणीनं रात्रीं-अपरात्रीं क्लबांत जाऊन परपुरुषांबरोबर अंगाला अंग घांसून नाचणं शोभत नाहीं.'

'मग काय शोभतं तें तरी सांग ?'

'आपल्या प्रकृतिला पाश्चात्यांचा तो धिंगाणा मानवत नाहीं.'

'मग भारतीय चित्रपटांतला तो धिंगाणा पाहायला तुझ्या सारख्या कर्मठ माणसांची देखील रीघ लागते, हा दांभिकपणा नाहीं काय ?'

'निश्चितच आहे. पण तो पाहण्यापुरता मर्यादितच. आचरणाइतका खुळचट नव्हे !'

'आचरणांत खुळचटपणा आहे हें कोणत्या आधारावर ?'

'नृत्याची आवड असणाऱ्यांना भारतीय नृत्यें -मणीपुरी, कथ्थक, कथाकली, भारत-नाट्यम् अधिक आनंद देऊं शकतील.'

'जातीच्या कलावंतांना कलेंतला कोणताहि प्रकार चालेल !'

'पॅरीसचीं नग्ननृत्यें हा प्रकार का चालूं नये ?'

'तो कलेच्या नांवाखालीं घातलेला धुडगूस होईल !'

'म्हणजे कांहीं मर्यादेपर्यंत तुला माझीं मतें पटतात तर ! अर्थात यांत मला आनंद आहे. परंतु मला खेद एका गोष्टीचा होतो कीं जितक्या सफाईनें तूं पाश्चात्य नृत्यें करतेस तितक्याच सफाईनें तूं हीं भारतीय नृत्यें करूं शकत नाहींस. खरें ना ?'

ती क्षणभर कांहीं बोलत नाहीं. किंचित् चाळवाचाळव करते. मग श्वास खूप आंत ओढून; तो दीर्घ सोडते. तसं करतांना ती नुसतींच त्याच्याकडे बघते. थोड्यावेळानं म्हणते—

'माझीं ती नैसर्गिक प्रवृत्ती नाहीं हें तुला अजूनहि कळलें नाहीं तर ?'

ढगांचा गडगडाट होतो. तो थोडा वेळ कांहीं बोलत नाहीं. नंतर म्हणतो—

'कळलं. मघांशीच कळलं. पण कलेच्या प्रांतांतला हा एकांगी अभ्यास कां ? शिवाय इंग्लीश नृत्यें हीं इंग्लीश पोषाख चढवून केलीं तरच ती इंग्लीश वाटतात कां ? नउवारी लुगड्यांतली इंग्लीश नृत्यें इंग्लीश वाटण्या-ऐवजीं भारतीय वाटतील काय ?'

'मला एक पटते तुझा सगळा रोख माझ्या ह्या इंग्लीश पोशाखाविषयीं आहे. मी हा पोशाख करते-तशी वागते म्हणून तुझा माझ्या-वर राग आहे !'

तो बोलत नाहीं. ती निर्वाणीच्या सुरांत म्हणते—

'मी तुला त्या बाबतींत सांगितलंच आहे कीं ती माझी प्रवृत्ती आहे म्हणून ! नैसर्गिक प्रवृत्ती ! शिवाय तूंच म्हणतोस कीं निसर्ग माणसाला झुकवितो म्हणून ! तशीच मी झुकल्यें आहे. मी ह्या पोशाखांत तुला कदाचित सुंदरहि दिसत नसेन'

तो तळमळीनं बोलतो—

'कमल, तूं सुंदर आहेस. अतिशय सुंदर आहेस. जातीच्या सुंदरांना वास्तविक कोणत्याच गोष्टीची आवश्यकता नसते. सौंदर्य-प्रसाधनांची गरज फक्त कुरूपांना असावी. परंतु सौंदर्यप्रसाधनांसाठीं तूं किती खर्च करतेस ? आणि हा खर्च कुणासाठीं ? कशासाठीं ?'

ती त्याच्या बोलण्यामागची तळमळ जाणत नाही. उद्धटपणान म्हणते -

स्वतःसाठीं ! केवळ माझ्यासाठीं ! सौंदर्य-प्रसाधनांनीं अधिक सुंदर होतां येतें. निदान मूळच्या सौंदर्यांत अधिक भर पडते तर त्याचा कां फायदा घेऊं नये ? आजच्या तरुणांचा पोशाख कसा आहे ? सिनेमांतल्या नटांसारखा ! झिब्रासारखे मणिले-लांडे पँटस-कमरेला कमर-पट्टा-डोक्यावर आलेलें केंस ! हीच कां आजची नैतिकता म्हणतोस ? यांत भारतीयपणा आहे कां ?'

'नाहीं. मुळींच नाहीं. पण त्याला कारण काय याचा विचार केला तर तुझ्यासारख्या अनेक वेछूट तरुणींचा तांडाच त्याला कारणीभूत असल्याचें तुला वेगळें सांगावें लागणार नाहीं.'

'म्हणजे ? अर्थ नाहीं समजलें मी तुझ्या या बोलण्याचा ?'

'अर्थ स्पष्ट आहे. तुमचा आजचा पोशाख त्याला कारण आहे. पैशाच्या लोभानें वाटेल तशा पोशाखांत-अपुऱ्या पोशाखांत वावरणाऱ्या नट्या त्याला कारण आहेत. तुमचा स्वच्छंदी स्वभाव त्याला कारण आहे !'

'अमूक व्यक्ति तसं वागल्यानं कांहीं म्हणेल याची धास्ती बाळगण्याइतकं माणसानं कमजोर असूं नये. आपण आपणापुरतं तरी स्वच्छंदी असावं !

'बरोबर आहे !'

ती पुन्हां त्याच चढलेल्या आवाजांत विचारते—

तसं नसलं तर स्वतःच्या मनावर स्वतःचा ताबा गाजवूं शकत नसल्याचं सिद्ध होत नाहीं काय ?'

'कमल, प्रत्येकजण आपल्यापुरता स्वच्छंदी असतो. तरी पण त्यालाहि इतर वडिलधाऱ्या माणसांच्या धाकाचीं कांहीं बंधनं असायलाच हवीं असतात. तीं नसलीं तर केव्हां त्याचा तोल सुटेल याचा नेम रहाणार नाहीं !'

ती कांहीशी चिडून विचारते—

'हा असला पोशाख करणं-राहणीचा असा दर्जा ठेवणं, ख्रिश्चन लोकांबरोबर फिरणं या गोष्टीला तूं तोल सुटणं म्हणतोस ?'

तो समजावणीच्या सुरांत सांगतो—

'वाटल्यास ती पहिली पायरी होऊं शकेल. आणि तीहि साधीसुधी नव्हे; चांगली निसरडी म्हटलं पाहिजे !'

'म्हणजे, मी आतां जशी राहते-म्हणजे तुझ्या दृष्टीनं जशी वागते-त्या वागण्यामुळें लवकरच माझा तोल सुटेल असं तुला वाटतं कां ?'

'त्याबद्दल आतां या क्षणीं निश्चित कांहीं सांगतां येणार नाहीं. कदाचित् तोल सुटेलहि-



अनुक्रमणिका

कदाचित् नाहीहि. त्याचा कांहीं नेम नाहीं ! '

' आपला नेमका कोणत्या ठिकाणीं तोल सुटतो आहे याची ज्याला जाणीव नसते तो स्वतःपुरतांच नव्हे तर इतरांकरितांहि मूर्ख ठरतो, हें मी समजतें. तुलाहि तें पटत असावें ? '

' अलबत् ! '

' परंतु असं कांहीं बोलण्यांत, मी माझा तोल सुटूं दिला आहे, असं वदविण्यांत; तूं आपला स्वतःचा तोल सुटूं दिला नाहीं काय ? '

तिच्या त्या फटकाऱ्यानें त्याचा चेहरा पडतो. तो स्वतःला सांवरतो. अगदीं हलक्या आवाजांत म्हणतो—

' कमल, वर वर बघितल्यास मी जें कांहीं तुला सांगितलं त्यावरून माझा तोल सुटला आहे असं कुणालाहि वाटेल; म्हणूनच तुलाहि वाटलं. पण नैतिक जबाबदारीच्या दृष्टीनं तुला याबाबतींत कांहीं सांगावंसं वाटलं म्हणून मी सांगितलं आहे. त्यांत राग येण्यासारखं कांहीं नाहीं. वडिलधाऱ्या माणसांच्या धाकाची कांहीं तरी बंधनं असावींत असं जें मला वाटतं तें याच संदर्भात. असं कांहीं सांगण्याचा मला थोडा तरी अधिकार आहे-निदान असावा या जाणिवेनंच मी बोलतो आहे. वास्तविक तुझ्या प्रत्येक हालचालीला-बऱ्यावाईट वागणुकीला लोक मला जबाबदार धरतात. '

त्याच्या त्या बोलण्यानं ती थोडी शांत होते, थंड स्वरांत विचारते-' माझीं कोणती बरी-वाईट वागणूक तुला खटकते ? माझ्या कोणत्या वागण्यामुळें तुझ्यावर माझ्यासाठीं खालीं मान घालण्याचा प्रसंग ओढवतो ? '

तो शांत पण कडवट स्वरांत तिला म्हणतो—

' सांगूं नये असं मला वाटतं ! '

' तूं सांगावंस असं मला वाटतं ! '

तो निर्धारानं म्हणतो—

' तर ऐक— '

ढगांचा गडगडाट सुरू झाल्यानं तो सांगायचं थांबवितो. आवाज विरल्यावर म्हणतो—

' परवां तूं ' शॅम्पेन ' पिऊन अगदीं तर्र झाली होतीस; त्या धुंदींत तूं नृत्य करीत होतीस आणि नृत्य करतां करतां तूं त्या अव्यवस्थित पोशाखांत बेहोष झाली होतीस, आठवतें ? '

' आणखीन '

' पोहतांना नरेंद्रानें तुझी किती थट्टा केली ?'

सुनील कमलकडे रोखून बघतो. नजरेला नजर मिळवितो. मग आग ओकावी तसा विचारतो—

' आठवतें ? आणि तीहि शारीरिक थट्टा ?'

ती खालीं मान घालते. कांहीशीं अस्वस्थ होऊन म्हणतें—

' पुढें ?'

' मिस्टर डिसूझानं तुला आलिंगन देऊन तुझं दीर्घ चुंबन घेतलं होतं'

ती किंचाळून म्हणतें—

' खोटं आहे हें !'

'खोटं आहे ?' सुनील रागावून विचारतो.

' हो हो खोटं आहे. कुणीतरी तुझे कान भरविले आहेत ?'

आणि मग ती चिडक्या स्वरांतच विचारतें-

' आणखी कांहीं ?'

' इतकीं उदाहरणें पुरविल्यावर आणखी कांहीं म्हणून काय विचारतेस ?

'तूं यांतलं काय पाहिलंस ?'

' असल्या गोष्टी ज्या ठिकाणीं घडतात त्या ठिकाणीं जाण्याचीहि माझी इच्छा नाहीं.'

' मग दुसऱ्यानं सांगितलेल्या वायफळ गोष्टींवर विश्वास ठेवून आपणावर माझी जबाबदारी असल्याचं समजून, मी कांहीं तरी तोल सुटण्यापर्यंत करीत आहे असं बेधडक बोलणं चांगलं आहे काय ?'

' यापुढं तुझी तशी इच्छा असेल तर चांगलं-वाईट तुझं तूंच ठरव.'

' प्रियकर या नात्यानं ती जबाबदारी तुझ्या-वर हें खरं, परंतु केवळ त्यासाठींच मी माझ्या मनोवृत्तींना माझ्या इच्छेविरुद्ध जखडून टाकावं हें मला मुळींच पटत नाहीं.' ती निर्धारानं म्हणते.

तो चिडून विचारतो—

' मग काय पटतं ? '

' मला तसल्या पोषाखांत राहणं आवडत असेल-तसलं नृत्य आवडत असेल-ती संस्कृती आवडत असेल तर त्याला इतरांची तरी कां आडकाठी असावी ? कां ?'

' इतरांची म्हणजे माझीच ना ?'

' हो हो तुझीच !' ती अतिशय त्वेषानं म्हणते. तिचा राग तिच्या चेहऱ्यावर उमटतो. ती चिडल्यासारखी होते. म्हणते—

" मी परपुरुषाबरोबर नृत्य करते म्हणून कांहीं मी माझी नैतिक जबाबदारी विसरल्यें आहे असं नाहीं. माझं तुझ्यावर निस्सीम प्रेम असल्याची तुला एकट्याला जरी खात्री असली तरी इतरांच्या म्हणण्याला मी विशेष महत्त्व देणार नाहीं. महत्त्व देणं म्हणजे स्वतःच्या खात्रीला स्वतःच सुरुंग लावण्यासारखं आहे ! '

तिच्या या बोलण्यानं सुनील मनांतल्या मनांत हबकूनच जातो. काय बोलावं-कसं बोलावं हें त्याला सुचतच नाहीं. तो घुटमळतो, मनाशीं विचार करतो मग अगदीं खालच्या स्वरांत म्हणतो—

' तूं माझीच होणार आहेस याची मला खात्री आहे. परंतु केवळ तशी खात्री आहे म्हणून माझी हळसांड करणं-माझ्या आकां-क्षांना काडी इतकंहि महत्त्व न देणं म्हणजे आपण करतों तेंच ठीक करतों असं समजून प्रियकर-प्रेयसी या नात्यानं आपला एकमेकांचा एकमेकांवर कांहीं सांगण्याचा,कांहीं समजण्याचा किंवा कांहीं समजून घेण्याचा, कांहीं समजावून सांगण्याचा अधिकार नसल्यासारखंच आहे. निदान मला असं वाटतं. असं वाटतं म्हणून मी म्हणतो कीं अमक्या वयांत अमूकच केलं पाहिजे हें जितक बरोबर तितकंच त्यापेक्षां अधिक कांहीं करणं त्या वयाला शोभत नाहीं. '

कमल नीट ऐकून घेते. मग म्हणते—

' तुझं म्हणणं मला यापूर्वीहि पटलं. वयाच्या मानानं तुझ्यांत अधिक पोक्तपणा आला आहे. ज्या वयांत असं कांहीं बोलणं किंवा अशा प्रकारचा उपदेश करणं शक्य नसावं त्या वयांतच तूं हें सर्व कांहीं करीत आहेस ! '

तो कांहींच बोलत नाहीं. तिच पुढें म्हणते—

' म्हणूनच मला वाटतं कीं तूं सिद्ध करीत असलेल्या एका नियमाचें उल्लंघन, तो नियम सिद्ध करीत असतांनाच तूं करीत आहेस. हेंच खरं आश्चर्याचं आहे !'

सुनील हंसून म्हणतो—

' आश्चर्य आहे खरं. निदान या वयांत असा उपदेश करण्याची पाळी येईल याची खरं म्हणजे अपेक्षा नव्हती. तूंच अशा रीतीनं वागली नसतीस तर मला इतक्या खोलवर जायचं कारणच उरलं नसतं.'

' पुन्हां तेंच. मी माझ्या मनोवृत्तींना दाबूं शकत नाहीं. तसं करण्याची माझी इच्छा नाहीं. लोकांना मी जें केलेलें आवडत नाहीं, त्याला मी काय करूं ? मी कसं असावं-कसं नसावं, हें ठरविणारे ते कोण ? मला त्यांच्या आवडीनिवडीचं काय ? उद्यां ते मला म्हणतील, तूं परकर पोलक्यांत राहिलीस तर






अधिक चांगली दिसशील. तर मी तसंच वागावं काय ?

' खरंच तसं वागूं नये. माझं म्हणणं तूं माझ्या आवडीनिवडीनुसार किंवा इतर कुणाच्या आवडीनिवडीनुसार वागावं असं कधींच नाहीं.' तो खिडक्या उघडायला जातो आणि खिडकीच्या पक्का बसलेला ' बोल्ट ' काढून ती उघडी करतांना तिच्याकडे वळून म्हणतो—

' परंतु स्वतःची लाज स्वतःला असलीच ना !'

लख्खन् वीज चमकते. त्याचा चेहरा क्षणभर उजळून जातो न् जातो तोंच ढगांचं आकाश कोसळून पडावं तसा आवाज झाल्यानं तो किंचित हादरतो. ती निश्चल उभी असते. म्हणते–

' मी निर्लज्जासारखी वागत आहे असा अर्थ आहे तुझ्या या बोलण्याचा.'

तो स्वतःला सांवरून घेतो. खोंचकपणें तिला म्हणतो—

' माझ्या बोलण्यांतून अर्थ बरोबर काढतां येतो तर ? '

ती भडकते. त्वेषानं विचारते–

' लाज वाटण्यासारखी कोणती गोष्ट तुला खटकते ? प्रियकर या नात्याच्या अधिकारी-बंधनाची पहिली सांखळी स्वीकारून मी हें विचारीत आहे ! '

वाऱ्याची एक थंडगार ओली झुळूक खोलींत येते. तो आपल्या कोटाची कॉलर दुमडून झुकून तिचे आभार मानतो. म्हणतो–

' तुला क्षितिजापार जावसं वाटतं. तुझा हा पोशाख खरोखरच अश्लील आहे काय ? तुझ्या शरीराचा बांधा ठसठशीत आहे, शरीराचे अवयव रेखीव आहेत, वर्ण गोरा आहे, हें सर्व दाखविण्यासाठीं तुझ्या अंगावरल्या इतक्या तलम कपड्यांची आवश्यकता असावी हें मला पटत नाहीं. '

ती थंडी जाणवते म्हणून दोन्ही हाताचा क्रॉस वक्षस्थळाशीं दाबून धरते. त्याचं म्हणणं नीट ऐकून घेते.

तो पुढें म्हणतो–

' शरीराचं फाजील प्रदर्शन न करणाऱ्या तलम नसणाऱ्या अंगभर पोशाखानंहि शरीर-सौष्ठव ठसठशीत दिसतंच कीं ! त्यासाठीं ही झिरझिरीत वस्त्रेंच कशाला हवीत ? उन्नत उरोज दाखविण्यासाठीं तो अर्धाअधिक उघडा ठेवणं आवश्यक असतो असंहि कांहीं नाहीं !'

तो थांबून तिच्याकडे बघतो. ती लाजून चूर झालेली असते. खाली मान घालून नुसती ऐकत उभी असते तो पुढें म्हणतो–

' मला क्षमा कर. वास्तविक असं कांहीं बोलून दाखविणंच अश्लील वाटेल, परंतु तें कटुसत्य आहे. प्रियकर या नात्यानं मी कांहीं सांगूं शकतो असं तूं म्हणालीस म्हणून मी हें बोलतो आहे. त्यांत वाईट असं कांहींच नाहीं.'

' वाईट नाहीं. तथापि प्रियकराच्या अधिकारानेंच मला माझ्या मनोवृत्तींना–म्हणजे नैसर्गिक प्रवृत्तींना डांबणं निसर्ग नियमाना धरून आहे काय ? निसर्गच मनुष्याला झुकवितो असं तुझं म्हणणं आहे ना ?'

' होय !' तो ठामपणें म्हणतो. नंतर दुसरीहि खिडकी उघडतो. खिडकी उघडतांच पडदा फडफडूं लागतो.

ती पुढें म्हणते—

' मी मनानं आणि शरीरानं पवित्र आहे. अन् त्याच पवित्र मनानं मी तुला प्रियकरच नव्हे तर पति म्हणूनहि स्वीकारीन. परंतु निसर्ग-निदान माझ्या प्रवृत्तींशी समरस झालेला निसर्ग मला ह्या बंधनांत जखडल्याशिवाय राहील काय ?'

तो फडफडणाऱ्या पडद्यांकडे बघतो. म्हणतो–

' निसर्ग जसा मनुष्याला झुकवितो तसा मनुष्यहि कांहीं प्रमाणांत निसर्गाला झुकवूं शकतो. म्हणजेच पतीचं नात स्वीकारूनहि तू निसर्गाला झुकवूं शकतेस ! '

' मला तुझ्या मूर्खपणाबद्दल कांहीं बोलायचं नाहीं. तूं सिद्ध करीत असलेल्या सिद्धांताचें उल्लघन तो सिद्धांत सिद्ध करीत असतांनाच करीत असतो, हा दुसरा अनुभव. ह्या व्यतिरेकाची मला कींव येते ! '

तो निश्चयानं विचारतो—

' याचा अर्थ तूं विवाह झाल्यावरहि असाच वागशील ? ' दरवाज्याचीं व खिडक्यांचीं दारें वेगवान वाऱ्यामुळें मागेपुढें होतात. जोरदार वाऱ्याच्या हबकाऱ्यानें कमलचे केस सरळ उभे होऊन तोंडावर पडूं पाहतात. ती दोन्हीं हातांनीं केंस सावरते. तो खिडक्यांचीं किंवा दरवाजाचीं दारें बंद न करतां तिच्याकडे नुसता बघतो. ती म्हणते—

' अर्थ बरोबर काढून घेतल्याबद्दल तुझं कौतुक करावसं वाटतं ! '

सुनील अतिशय कष्ट आवाजांत म्हणतो–

' पण ह्या कौतुकाचा कांहींच फायदा नाही. फक्त आपल्या माणसाचंच केवळ कौतुक करावं. समजलीस ? ' त्याच्या बोलण्याची खोंच तिच्या लक्षांत येते. तिचा स्वर जड होतो. ती म्हणते–

' ठीक आहे. आतां जातांना तुला जाण्याबद्दल विचारण्याची कांहींच आवश्यकता नाहीं ! '

' अर्थातच नाहीं ! ' सुनीलचा स्वर माराबल्यागत असतो.

' ठीक आहे !' ती आपल्या पर्सशीं चाळवाचाळव करते. नंतर दोन्हीं ओंठ आंत दुमडून क्षणभर थांबते आणि नंतर मनाचा निश्चय करून झपूझप् चालूं लागते.

तो तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहतो. ती दरवाज्यांतून निमिषार्धांतच दिसेनाशी होते. तो दरवाज्यापर्यंत जात देखील नाहीं. पँटच्या खिशातून सिगारेट केस काढून त्यांतली एक सिगारेट ओठांत अडकावितो. लाईटरची बारीक खिराडी अंगठ्यानं खर्रकन् फिरवितो. ठिणग्या उडून लाईटर पेटतो. सिगारेट शिलगावितांना लाईटरची कमीअधिक होणारी ज्योत बघतो. धुराच्या लोटानें, डोळे किलकिले करून तो ती ज्योत विझवितो आणि मग अस्वस्थपणें एकसारखा सिगारेटचे दम मारूं लागतो.

बाहेरून गाडी सरकल्याचा आवाज येतो. तो खिडकीतून वाकून बघतो. चकचकीत डांबरी ओल्या सडकेवरून फियाट वेगानें निघून जात असते.

पाऊस एकदम थांबलेला असतो. वाऱ्याचा वेगहि कमी झालेला असतो. ओल्या पाखरांगत भिजलेली मरीनड्राईव्ह विद्युत् प्रकाशानें चमचमत असते. बाजूचा समुद्र खवळलेला असतो. त्याच्या डोंगरलाटा मोठमोठ्या खडकावर आपलें डोकें आदळीत असतात. आदळल्यावर चित्कारीत असतात. डोकें फुटल्यागत.

तो सारें बघून घेतो ओठातली सिगारेट बुटाखालीं ठेचतो. कोचांत निर्वाणपणें बसतो. दोन्हीं हातांच्या तळव्यांत तोंड गच्च दाबून धरून.

ओले झालेले खिडकीवरले पडदे दारांना चिकटून असतात आणि सताड उघडा असलेला दरवाजा दोन्ही हात पसरून उभा असतो. निश्चलपणें !

## भीष्माचा डोंगर

...पान १३ वरून

'जमिनी आमच्या. तलाठ्यासमक्ष हद्दी आंखून घेतों आहोंत.' भाऊ कुळकर्णी नाराजीच्या सुरांत म्हणाला, 'आणि तूं म्हण भानगडी. हूंः!'

'होय घ्यायलाच हव्यात! भाऊ मी तर म्हणेन खुंट उभारून मजबूत कुंपण घालायला हवं, झालंच तर गडगासुद्धां. म्हणजे पुढं भानगडी नकोत.' अण्णानं सांगितलं.

'याचा मतलब, अण्णा?' गुणाजी नाडकर्ण्यानं विचारलं.

म्हणजे म्हाताऱ्याच्या बोलण्याचा रोख त्याच्या ध्यानांत आला नाहीं असं कधीं होईल? पण नाटक मात्र बेमालूम वठवलं. वाटावं हा अगदींच बुद्दू असावा!

'अरे, बरोबर आहे त्याचं गुणाजी!' कंपनीच्या खाणी उद्यां सुरू झाल्या कीं नसत्या पंचायती! म्हणून तर ही तयारी.' बाळ्या नाबरानं संपूर्ण खुलासा केला.

नाहींतरी अजून तो जरा कच्चाच होता. बाकीच्यांसारखाच मतलबी. पण बोलण्यांत धोरण नव्हतं. उतावीळपणं भडाभड बोलून जाई. नेमकं नको तेंच!

'कुठची कंपनी काढलीस ही बाळ्या?' भाऊ कुळकर्ण्यानं त्याला दटावलं.

बाळ्या नाबर खट्टू झाला. सारवासारव करीत म्हणाला, 'कंपनी? भाऊ, अरे कंपनी आतां ह्या अण्णाचीच. म्हणजे ह्याच्या कमळीचा तो पोर—'

पहिली चूक निस्तरण्यासाठीं बाळ्याची आतां ही दुसरी चूक! गुणाजी नाडकर्णी आणि वसंत बापला डोळा घालून त्याला चूप करीत होते, पण खुणावून गप्प बसणाऱ्यापैकीं बाळ्या नाबर नव्हता.

तरीबरं! अण्णागुरुजीचं तसं लक्ष नव्हतं.

'भाचा तो माझा! त्याचं काय म्हणतोस?' अण्णागुरुजीनं विचारलं.

'तुझ्या भाच्याचं नांव काय रे!' बाळ्यानं प्रश्न केला.

'विजय—विजय शिर्के.'

'म्हटलंच मी गुणाजीला. अण्णा तुझ्या कमळीचा हा पोर कंपनींत असिस्टन्ट मॅनेजर होणार.'

'आं! तुला सांगितलं कोणी? कां तूंच केलीस ही नेमणूक?' अण्णागुरुजीनं हंसण्यावारी नेलंन्.

'सांगितलंन् मसण्यानं! खरं आहे कीं नाहीं बोल.'

'खरं? एकदम झूट! अरे, तुमच्या तोंडून चांगली बातमी निघणारच नाहीं. काय?' प्रत्येक वाक्यावर हासून जोर देत अण्णागुरुजी म्हणाला, 'हातांतली काठी त्यानं त्वेषानं जमिनीवर आपटली. अंगांत वारं यावं तसा तो नुसता घुमत राहिला, 'भांचोद! कोणाचं बरं नाहीं बघवणार. दंतात एकएक पुड्या सोडून. उद्योगच काय दुसरा? आं! नव्हां हें असलं कांहींतरी करायचं! बामणं हीं? थूः तुमची!'

वसंत बापला नाईकाला हें ऐकवेना. म्हणजे बामणांची निर्भत्सना सहन होईना. तो उसळला, 'थेरड्या, तोंड आवर.'

'मला—मला थेरडा म्हणतोस? धाः! वाः!' अण्णागुरुजी मलतांच पेटला.' अरे वसंता, तुझ्या आजानं नाहीं कधीं म्हटलं रे! तुझा बाप बापला नाईकसुद्धां तसा माझा मान ठेवूनच वागला. पण तूं, कालचा पोर, काय? हें धोतर कमरेला गुंडाळायला शिकवलं मी. तर मलाच, अण्णागुरुजीला थेरडा म्हणतोस. पावन झालों बाबा पावन! काय, पावन!...'

वसंत बापलानं त्याला पुढं बोलूं दिलं नाहीं. म्हाताऱ्याच्या हातची काठी हिसकून घेतली. तीच उगारून अण्णाच्या अंगावर तो धांवला. पोलीस पाटलाला मध्यें पडावं लागलं. वसंत बापलाला त्यानं आवरलं. बाजूला केलं.

काठी हिसकून घेतांच अण्णागुरुजी मोटकळी होऊन खालीं जमिनीवर पडला. गुणाजी नाडकर्ण्यानं हाताला धरून त्याला उठवलं. त्याच्या अंगावरची धूळ झाडली. उगाच वाईट वाटल्यासारखं करून म्हटलं, 'अण्णा, नीट तूं आतां'

'होय, निघायलाच हवं- काय?' म्हातारा लटपटत उभा राहिला. बोलला, 'महामायेची कृपा म्हणून बचलों.'

'छाः! अण्णा, तुला हात लावायची कोणाची हिंमत आहे रे?' पोलीस पाटलानं खणखणीत आवाजांत विचारलं.

'मलाही असंच वाटायचं!' अण्णागुरुजीनं म्हटलं. तो खवट हंसला. आणि डोळ्यांच्या खांचांतील पाणी पुसलं. 'पण म्हातारा झालों मी. थेरडा झालों, कसं? आतां कोणीही उठावं आणि मारावं मला. हात टाकावा, काय? आणि तुम्ही? भांचोद, तुम्ही ती गंमत बघावी! भाऊ कुळकर्ण्या, तुला तर एकदम बरं वाटलं असेल? नाहीं रे?'

भाऊ आपला गप्पच बसला. जाब केला गुणाजी नाडकर्ण्यानं. सांगितलं, 'अण्णा, बाळ्या खरं सांगत होता. तूं मात्र निष्कारण चिडलास.'

'खूळ लागलं आहे मला.' अण्णागुरुजी बोलला.

'स्वतः मीच वाचली आहे तार.' गुणाजी म्हणाला.

'तार?'

'अरे पोराची—कमळीच्या. शिर्क्या शिर्क्या करीत तारमन आपला माझ्याकडे आला. पत्ता हा असा—विजय शिर्के, केअर ऑफ अण्णागुरुजी, रेडी. आतां मला रे काय माहीत? वाटलं त्या अण्णाच्या शाळेची भानगड असावी. तार घेतली, फोडून वाचूं लागलों, तर हें—अपॉइंटेड असिस्टंड मॅनेजर. रिपोर्ट ड्युटी इमीजिएटली ॲट रेडी माईन्स-पुरुषोत्तम. म्हणजे कळलं का काय तें अण्णा?' गुणाजीला आपल्या ज्ञानाचं प्रदर्शन करण्याची संधी आली होती.

'कळलं!' अण्णानं म्हटलं, 'लोकांचीं पत्रं फोडून वाचण्याची खोडच तुला. शेन्सार तूं गांवचं, काय?'

या अशा बोलण्याची गुणाजीला नाहींतरी संवय होतीच. तो फक्त हंसला. म्हणाला, 'कंपनींत असिस्टंट मॅनेजर झाला तुझा भाचा. अरे अण्णा, बत्तासे वाट उभ्या गांवाला.'

'वाटणारच! कां म्हणून विचारा कीं! अरे माझ्या भाच्यानं तुम्हा बामणांची बत्तीशी बिलकुल फोडली रे! एकाहून एक कौरव तुम्ही! पण छाः! नाहीं, एकालाही कंपनीनं नाहीं घेतलं.'

तसं भाऊ कुळकर्ण्यानं हळूंच म्हटलं, 'अरे वशिलाच ताठ त्याचा.'








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

'बशिला ! भाऊ, अण्णागुरुजी बशिल्यानं कामं करीत नाहीं. तो काय करतो तें सरळ. हां ! '

' तुझा नाहीं रे बाबा ! बशिला भाविणीचा–कमळीचा. ती एकदा पडली कीं हा पुरुषोत्तम का कोण–' आणि भाऊ कुळकर्णी घोड्यासारखा खिंकाळला.

अण्णागुरुजीला आवरतां आवरतां बाकीच्यांची मात्र पुरेवाट झाली. फुंकर मारली तरी पडेल असा किरकोळ म्हातारा, कुठून इतकं बळ आलं काय कीं ! तो बेफाम झाला, एकदम अनावर झाला. पिसाळल्या कुत्र्यासारखा ताडताड उड्या मारीत सुटला. पोलीस पाटील, बाळ्या नाबर आणि गुणाजी नाडकर्णी यानीं कसाबसा त्याला धरला. बाबापुता केलं. समजूत घालण्याचा प्रयत्न केला पण म्हातारा ऐकेचना ! आणि तशी त्यांनीं अण्णागुरुजीला महामायेची आण घातली. म्हटलं, ' आता निमूट गेला नाहींस तर तुला महामायेची आण ! '

महामायेची आण अण्णा काय मोडतो ? भरतीची लाट किनाऱ्यावर फुटून फेसाळत मागं फिरावी तसा तो मागं वळला. थरथर कापतच वाटेला लागला. तोंड चाललं होतं. नाहींतरी तें थांबणं आतां कठिण होतं.

कधीं नाहीं तो, वाटेंत अण्णागुरुजी आज खळनाथाच्या देवळांत शिरला. दारांतच थाबूनं त्यानं नमस्कार केला. ओरडला, 'तूं–तूंच घेरे बाबा दाद यांचा ! याना बघून घे !'

आंत दाजी नाबर प्रदक्षिणा घालीत होता. त्याचा एक नेम होता. घराला लागून वर खळनाथाचं देऊळ होतें. दुपारला आंघोळ झाली कां देवदर्शन आणि तीर्थ घेऊनच मग दाजी जेवण करी.

तर दाजीनं ऐकलं वाटतं. तो बाहेर आला आणि हंसून म्हणाला, ' अण्णा, खळनाथ आम्हाला रोजच बघतो. '

'रोज बघतो ? आणि कांहीं करीत नाहीं !' अण्णागुरुजीनं तिरसटपणानं विचारलं. ' हा देव झाला दाजी ? आंधळा तरी असावा ! नाहीं तर नालायक ? '

' गांव संपलं ! तसा आतां देवाशीं काढ तंटा. '

' काढीन ! त्यानंच बामणांची ही औलाद पैदा केली. '

' टाळकं फिरलंय तुझं अण्णा ! '

' असं म्हणणारच तूं. बामणच ना ? '

' अण्णा–' दाजी नाबर आतां मात्र उसळला.

' काय रे दाजी ? ' अण्णागुरुजीनं त्यांना स्वरांत विचारलं.

' तूं हलकट आहेस. '

' मी एक, तूं सात ! '

' साप आहेस. '

' साधा. गरळ नाहीं माझ्यांत. तें असतं बामणांत. नुसत्या फुत्कारांत वीष. '

' जा, नीच ! आधीं चालता हो ! '

' बामणं दिसल्या जागीं ठेचलीं पाहिजेत . सुखी होईल गांव ! ' अण्णागुरुजी काठी उगारीत बडबडूं लागला.

' मग ठेंच कीं ! काठी आहेच हातांत. हाण दाजीच्या टाळक्यात. टाक फोडून. ' दाजी नाबरानं वैतागून म्हटलं.

अण्णागुरुजीला हें आव्हांनच वाटलं. आणि त्याचं भान गेलं. आंतल्याआंत जाळ उडाला. एकदम भडका पेटला. पुढचा मागचा विचार न करतां उगारलेली काठी त्यानं दाजी नाबराच्या अंगावर हाणली. एकदा, दोनदा–पुन्हा अन् पुन्हा...

योगायोग असा ! तळ्यावर धरणाच्या गार पाण्यांत तासभर मनसोक्त डुंबून विजय याच सुमारास घराकडे चालला होता. देवळांत तोंड वाजलेलीं ऐकलीं आणि तो धांवला. बघतो तर–तर हा प्रकार ! दाजी नाबर दोन्ही हात कपाळावर घेऊन दारावरच बसला आहे...

आणि अण्णागुरुजी त्याला बडवतो आहे. आतां विश्वास तरी कसा बसावा ? स्वप्नांतसुद्धां अशक्य अशी ही घटना ! स्वतःवर नाहीं इतकं अण्णागुरुजीचं दाजीवर प्रेम होतं, भक्ति होती, श्रद्धा होती. आणि...

विजय तडक घुसला. दाजीच्या तो सरळ अंगावरच पडला. त्याला पाठीशीं घालून मध्यें आडवा झाला. अण्णागुरुजीच्या काठीचा प्रसाद खात ओरडला, ' मामा मामा. '

पण त्याचा मामा शुद्धीवर नव्हता. रक्तांत सूड, डोळ्यांत रक्त– अण्णागुरुजीला दाजी दिसत नव्हता, स्वतःचा भाचा दिसत नव्हता. दिसत होती फक्त बामणं–बामणंच ! दिसल्या जागीं त्यांना तो ठेचत होता, ठेचायला निघाला होता.

एव्हाना आतेबाई आणि वासंतीसुद्धां तिथं येऊन पोंचली होतीं. म्हणजे दाजीचा चढलेला आवाज ओटीवरून वासंतीनं ऐकला. तशी घरांत जाऊन आईला तिनं वर्दी दिली. धांवतच तीं दोघं देवळाकडे निघाली.

बैलाच्या दाव्याला हात घालावा तसा आतेबाईनं खस्दिशीं अण्णागुरुजीला मागं ओढला. दरडावून विचारलं, ' डोळे फुटले रे अण्णा ? कां मारतोस पोराला ?'

आणि मग तिचं लक्ष दाजीकडं गेलं. म्हणजे अचंबाच झाला. आतेबाईनं नाराजीनं म्हटलं, ' काय बघत बसलात हो ? याला काय मरूं देणार होतां ?

' अहो आतेबाई, हा विजय मध्यें नसता पडला तर आमचाच जीव जाणार होता, आहांत कुठं ? हा खुळा मलाच मारत होता. म्हटलं मारतो तर मारेना का ? पण एकदां याच्या अंगातलं हें भूत जाऊं दे–भूत जाऊं दे ! काय ? दाजी नावरानं सांगितलं.

' मरतुकड्या, ह्यांच्या–ह्यांच्या अंगावर हात टाकलास तूं ?' आतेबाई एकदम उसळून म्हणाली, 'कुठला रे तो हात ? जा ग वच्छी, कोलीत ये घेऊन चुलींतलं. लावतें याच्या हाताला.'

विजयला हंसूं आवरेना. तो मोटमोठ्यानं हंसत सुटला.

तसं वासंतीनं फणफणत विचारलं, ' हंसायला काय झालं हो ?'

' सगळंच ! हें असं गांव, हीं अशीं माणसं ! जगाच्या पाठीवर शोधून सांपडायचीं नाहींत बघा.'

' बघा तुम्हीच–मला उद्योग आहेत !'

' अहो, पण बघायला तुम्ही कुठं बाहेरच पडत नाहीं.'

' हूं: !' वासंतीनं तोंडाचा चंबू केला. मान उगाच उडवली. नापसंतीनं, नाराजीनं. खऱ्या का खोट्या देवजाणे ! आणि खाऊं का गिळूं अशा हिंस्र नजरेनं त्याच्याकडे पाहिलं.

' अहो, कोलीत आणता ना ! ' विजयनं सुचवलं आणि मनच्या मनांत नोंद केली–पोरगी भलतीच धिट दिसते.

दाजी नावरानंहि मोठ्यानं म्हटलं, ' तूं इथंच उभी ? धांव, आधीं कोलीत घेऊन ये. '

' दाजी, जाऊं दे ! एकदा सोडा यांना ! ' वासंतीचा गोंधळ उडाला होता. नक्की काय सांगावं समजेना. कांहीं बोलायला जावं आणि–याला–या विजयाला हंसायला संधी मिळायची. छेः ! नकोच तें !

आणि म्हणून–म्हणून ती पुढं बोलली नाहीं. पायाकडे दृष्टी लावून तशीच उभी राहिली.

' अग कोलीत अण्णाच्या हाताला नको लावूस ! हातांत दे. जा म्हणावं, पेटव गांव.'

आणि असं सांगून दाजी पोट धरून हंसूं लागला. तोच नाहीं तर विजयसुद्धां. वासंतीनं चमकून त्याच्याकडे पाहिलं आणि काय की ! तिला राहवलं नाहीं. तीही हंसत सुटली.

गुढग्यांत मान घालून खालीं पायरीवर अण्णागुरुजी बसला होता. ओशाळून, अपराध्यासारखा. त्याची त्यालाच लाज झाली होती. मन खात होतं? आणि त्यांत ही थट्टा ! म्हणजे सगळीं त्याला हंसत होतीं. बिचारा !

सद्गदित आवाजांत त्यानं तक्रार केली, ' आतेबाई, सगळीं मला हंसतात ग ! मी करूं तरी काय ?'

●●●



अनुक्रमणिका




# भरपूर करमणूक करणारा निम्मा-शिम्मा राक्षस

श्री. रत्नाकर मतकरी यांनीं लिहिलेल्या आणि त्यांच्याच 'बाल नाट्य' या संस्थेनें सादर केलेल्या 'निम्मा शिम्मा राक्षस' या नाटकाचा संस्मरणीय प्रयोग नुकताच झाला.

मुलांच्या आवडत्या नि चांगल्याच परिचयाच्या 'अल्लादिन आणि जादूचा दिवा' ह्या कथेच्या धर्तीवर 'अर्धवट' राक्षसाची ही विडंबनवजा विनोदी पद्धतीनें सांगितलेली कहाणी. मुलांतल्या हास्यास्पद कल्पनेचा विनोद-निर्मितीसाठीं कुशलतेनें, खुबीदारपणें उपयोग करून घेतला आहे. उदा:-राक्षस आपल्या अर्ध्याच मॉला घेऊन येईल ह्या विचारानें अबदुल्लानं राक्षसाला दोन मॉला घेऊन ये असं सांगणं, मुलतानानं राक्षसाला-अबदुल्लाला ठार मारण्याचा हुकूम देतांच त्याचं 'अर्धमेला' होणं नि पुन्हा 'जिवंत' होणं. आणखी एका प्रसंगीं अबदुल्ला व त्याची बिबी, हसन आणि त्याची बायको हसीना राक्षसाला 'आम्हां दोघांना घेऊन दूरवर चल' अशी आज्ञा करतांच तो राक्षस प्रत्येक जोडप्यापैकीं 'निम्म्या'नाच घेऊन जातो-अबदुल्लाची बिबी आणि हसन यांना! राक्षसाच्या गंमतीदार 'अर्धवट'पणाचा हा मार्मिक, उत्कट उत्कर्ष-बिंदू! परिणामीं, नाटकांत प्रत्येक गोष्ट अर्धवट करणारा हा 'निम्मा-शिम्मा राक्षस' दिग्दर्शक व लेखकाला न जुमानता एकच गोष्ट दुप्पट करतो, आणि ती म्हणजे मुलांची करमणूक!

अशा या रोमहर्षक कथेतील नाटकाचा प्रयोग सौ. विजया खोटे ह्यांच्या कसबी मार्गदर्शनाखालीं झक्क बसविला आहे. नाट्य-कृतींतील विक्षिप्तपणाला साजेशा 'फार्सिकल' अंगावर भर दिला आहे. एका पाठोपाठ एक असे येणारे विनोदी प्रसंग, ठसण्याइतपत नेमका आणि मोकळा अभिनय आणि बोलक्या हालचाली हीं या प्रयोगांतील प्रमुख अंगें. हें नाटक बाल प्रेक्षकांना खूपच आवडतें, ह्यांत शंका नाहीं. नाटकाची आणि प्रयोगाची रंगत चढती आहे हें उघडउघड जाणवणारें यश! राजा बापट, रमेश ढोनावर, विनायक पै यांच्या अभिनयामुळें या प्रयोगाला योग्य दर्जा प्राप्त झाला आहे. लेखक मतकरी व त्यांच्या पत्नी सौ. प्रतिभा मतकरी ह्यांनीं प्रथमतःच भूमिका केल्या असतांनासुद्धां, त्यांच्यांतला नवखेपणा जाणवला नाहीं हें विशेष!

बाल प्रेक्षकांना जागोजाग प्रतिसाद देण्यास भाग पाडून नाटकाच्या रंगतींत त्यांना विश्वासांत घेण्याची कल्पना एकदम स्तुत्य! त्यामुळें रंगमंच आणि प्रेक्षक ह्यांतील अंतर नाहींसें होऊन मुलें नाटकाशीं अधिक समरस होतात.

प्रत्येक गोष्टींतून मुलांनीं कांहींतरी शिकावं ही वडील मंडळींची धडपड. 'हृदयीं धरा हा बोध खरा' अशी वेळीं अवेळीं मुलांच्या कानीं-कपाळीं ओरडण्याची ह्यांची संवय! उलटपक्षीं, उपदेशामृताचे घुटके (एरव्हीप्रमाणें) करमणुकीच्या क्षेत्रांतही मुलांना मानवत नाहींत, हें थोरांच्या सहसा लक्षांत न येणारं तात्पर्य! मुलांना हवी असते मुक्त आणि स्वच्छ करमणूक. बालरंगभूमीवरील मुलांच्या प्रतिक्रिया जाणीव-पूर्वक अजमावून श्री. मतकरी ह्यांनीं ही गोष्ट अचूकपणें हेरली आहे. त्यांच्या 'कळलाव्या कांद्या' सारखी ही कहाणी विनोदी थाटाची, अधिक रोखठोक व साधीसुधी आहे. प्रस्तुत प्रयोग मुलांवर साधावयाचा परिणाम गम्मत जम्मत करून, हंसत खेळत करून जातो. पंतोजीपणाचा आव न आणतां! मुलांनीं जो काय शोध नि बोध घ्यायचा तो त्याच्यावरच सोपवलेला आहे, हें महत्त्वाचं!

नाटकांतील कथानकाला अत्यंत आवश्यक अशी प्रतिकात्मक आणि कलात्मक नेपथ्य-योजना श्री. श्याम आडारकर आणि रघुवीर तळाशीलकर यांनीं केली आहे. प्रतिकात्मक नेपथ्याचा इतका सुबक व नेटका उपयोग क्वचितच पहावयास मिळतो. मुलांनाही हा प्रतिकांचा उपयोग फारसा अपरिचित नसतो. फावल्या वेळांत आपसांत नाटक करतांना तीं वास्तवतेचं अवडंबर न माजवतां प्रतीकांचाच उपयोग करीत असतात. आणि ह्यांतूनच 'सगळंच जर खरंखरं करायचं तर त्याला नाटक कशाला म्हणायचं?' ही वृत्ती त्यांच्या अंगीं बाणलेली असते. रंगदृष्ट्या डोळ्यांना रिझवणारं व मुलांना सहज असं नेपथ्य उभं करण्याची कामगिरी यशस्वीपणें हाताळली गेली आहे.

'चिमणीचं घर होतं मेणाचं', 'ससा आणि कासव' अशी लहान मुलांच्या गोष्टींचीं शीर्षकं असलेलीं नाटकं प्रौढांसाठीं यशस्वीपणें सादर करणाऱ्या सौ. विजया खोटे प्रस्तुत नाटकाच्या निमित्तानें बऱ्याच कालावधीनंतर बालरंगभूमी-कडे वळल्या आहेत हें सुचिन्ह! बालरंजनाच्या ह्या क्षेत्रांत आपल्या कल्पक योजनेनुसार नवें नवें प्रयोग करून त्या मुलांसाठीं 'नवें गोकुळ' निर्माण करतील एवढीच अपेक्षा!

—रसिक मनोहर

# गौरवांकित झालेले दीपावलीचे तीन लेखक

महाराष्ट्र राज्याच्या शासनसंस्थेतर्फें झालेल्या 'पहिल्या मराठी चित्रपट महोत्सवांत गेल्या वर्षांतील 'प्रपंच' या बोलपटाच्या उत्कृष्ट दिग्दर्शनाबद्दलचें तीन हजार रुपयांचें पहिलें पारितोषिक आणि मानचिन्ह सुप्रसिद्ध कथा-लेखक आणि दीपावलीविषयीं आस्था बाळगणारे आमचे मित्र श्री. मधुकर पाठक यांना मिळालें याबद्दल आम्हांला खूप आनंद झाला. पाठकांनी दिग्दर्शिलेलें हें पहिलेंच चित्र. उमेदवारी पलीकडे त्यांना त्यांतला विशाल अनुभवहि नव्हता, परंतु उमेदवारीच्या काळांत त्या विषयाचें त्यांनीं सूक्ष्म आणि जीव लावून केलेलें निरीक्षण पहिल्याच खेपेला फळाला आलेलें पाहून आणि त्यांचें असें भरघोस कौतुक झालेलें पाहून खुद्द पाठकांना जेवढा आनंद झालेला असेल त्याहूनहि त्यांच्या स्नेह्यांना अधिक झालेला आहे. कारण आपल्या निर्मळ, निरागस स्वभावानें आपल्याबद्दलचें








निर्लेप प्रेमाचें स्थान त्यांनीं आपल्या स्नेह्या-सोबत्यांत निर्माण करून ठेवलेलें आहे. त्यांच्या अंगिकृत कार्यांत उत्तरोत्तर त्यांची भरभराट व्हावी अशी इच्छा दीपावलीतर्फे व्यक्त करतों.

कथा, पटकथा, गीत, संवाद या चतुष्टीच्या उत्कृष्टतेबद्दलचीं पहिलीं पारितोषिकें एका-मागून एक अशीं घेतांना त्या भारानें श्री. ग. दि. माडगूळकर लवले. महोत्सवाला आलेल्या प्रेक्षकांनीं टाळ्यांचा गजर करून या गोष्टीचें मनोमन स्वागत केलें. याबाबतींत माडगूळकर सव्यसाची आहेत ही गोष्ट निर्विवाद आहे आणि अजूनपर्यंत तरी त्यांचें तें स्थान अढळ आहे. तिथपर्यंत कुणी पोहोंचूं शकलेला नाहीं. श्री. माडगूळकरांचेंहि दीपावलीतर्फे आम्ही हार्दिक शुभचिंतन करतों.

त्याचप्रमाणें उत्कृष्ट अभिनेता म्हणून श्री. गजानन जागिरदार यांचाहि पारितोषिक देऊन सरकारनें गौरव केला. दीपावलीच्या पहिल्याच अंकाचे ते एक लेखक आणि हित-चिंतक म्हणून त्यांचेंहि अभिनंदन करणें हें आमचें परम कर्तव्य आहे. जागिरदारांची रुपेरी पडद्यावरील तपःश्चर्या ही वरील दोघांपेक्षां कितीतरी पटीनें अधिक आहे; किंबहुना मराठी चित्रपट सृष्टीच्या इतिहासाचें जागिरदार हें चालतेंबोलतें प्रतीक आहे. तिच्या प्रगतीचे आणि परागतीचे अनेक टप्पे त्यांनीं पाहि-लेले आहेत तसेच अनुभवलेलेहि आहेत. त्यांचा हा जो गौरव झाला तो त्यांच्या आज-पर्यंतच्या कर्तृत्वाच्या मानानें लहानच. यापुढें त्यांच्या कर्तृत्वाचें योग्य चीज व्हावें हीच शुभेच्छा !

—गोपालन

## द. र. ची २५ वर्षांची वाटचाल

श्री. द. र. कोपर्डेकर प्रकाशननें सुद्धां आतांच २५ व्या वर्षांत वाटचाल केली आहे. पैसा, अनुभव व परिचय यांचें पाठबळ नसतां-नाही केवळ मराठी साहित्य-संपदेची निर्हेतुक सेवा घडावी म्हणून त्यांनीं प्रकाशन व्यवसाय सुरू केला आणि या समयावधींत शंभरावर पुस्तकें प्रकाशांत आणलीं.हें स्वप्न साकार होणार कीं नाहीं अशी शंका होती, पण त्यांचें हें स्वप्न आज साकार झालें आहे. सरस्वतीच्या मंदिरांत अधिकाधिक चांगली, दर्जेदार व अध्ययनीय पुस्तकें निर्माण करण्याची आणि वाचकांसमोर ठेवण्याची त्यांची मनोइच्छा आहे. 'इंद्रायणी' मासिक त्यांच्या इच्छेचें प्रतिकच म्हणावें लागेल. त्यांच्या या धडाडीचें जेवढें कौतुक करावें तेवढें थोडेंच आहे. श्री. कोपर्डेकरांची मनोकामना पूर्ण होवो, हीच अपेक्षा !

### 'वाङ्मय शोभे'चा रौप्यमहोत्सव

मराठी साहित्यांतील वाङ्मयीन गुणांसाठीं वाहून घेतलेल्या 'वाङ्मयशोभा' मासिकानें नुकतेंच २५ व्या रौप्यमहोत्सवी वर्षांत पदार्पण करून मासिक सांप्रदायांत जी प्रगत वाटचाल केली, याबद्दल हार्दिक अभिनंदन करणें आव-श्यकच आहे. 'वाङ्मयशोभे'नें आपला रौप्य-महोत्सव साजरा करावा हा भाग्याचा क्षणच नव्हे काय ? कारण श्री. मनोहर महादेव केळकरांची 'वाङ्मय शोभा' २५ वर्षांची खड-तर वाटचाल करून आज रसिकमान्य झाली आणि अनेक कष्ट साहून आज भाग्यदिन पहात आहे. वाचकांच्या आवडीनिवडीची दखल घेऊन अन् वेळप्रसंगीं टोमणे देऊन लोकप्रियता संपादन करणें यासाठीं अंगीं कांहींतरी कसब हवें. तें कसब श्री. केळकरांनीं वाङ्मयशोभेंत आणलें असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं.

साहित्यसेवेचा हा वारसा श्री. केळकरांनीं, त्यांची 'वाङ्मय शोभा' व 'मनोहर ग्रंथमाला' नेटानें चालू ठेवला हें अभिमानाचेंच आहे. अशा या त्यांच्या आनंदाच्या वेळीं 'दीपावली' सुद्धां या त्रिताल यशस्वितेंत सहभागी आहे.

### सुवर्णमहोत्सवी 'अल्लादिन'

बालरंगभूमीच्या संयोजिका सौ. सुधा करमरकर यांनीं खास बालकांकरितां लिहिलेल्या 'अल्लादिन आणि जादूचा दिवा' या नाट-काचा सुवर्ण महोत्सवी प्रयोग गेल्या १ मे रोजीं रंगभवनांत त्यांच्याच बालरंगभूमीनें प्रस्तुत केला. ही बालरंगभूमीच्या इतिहासांत गौरवा-स्पद गोष्ट आहे. त्यांतल्यात्यांत महाराष्ट्र राज्याच्या वर्धापन दिनींच तो प्रयोग व्हावा, ह्यांतही एक औचित्य साधल्यासारखें आहे.

बालरंगभूमीचीं कल्पक आयुधें एकत्रित करून सौ. सुधा करमरकर यांनीं बालरंगभूमीची बीजें रोवूं घातली आणि अल्पावधींच आपल्या पहिल्याच कल्पक प्रयत्नानें सुवर्ण महोत्सवी यश संपादन केलें, ही गोष्ट केव्हांही अभि-नंदनीय आहे ! 'अल्लादिन आणि जादूचा दिवा' या कलात्मक नाट्यकानें केवळ बालसृष्टींतच लोकप्रियता मिळविली असें नाहीं तर थोरा-मोठ्यांनींसुद्धां याचें लाडीक कौतुक केलें आहे. बालहट्ट पुरविणें ही राजहट्ट किंवा स्त्रीहट्टापेक्षांहि कठीण गोष्ट !

बालकांच्या मनोभूमींतून अन् तीहि त्यांना हमखासपणें आवडेल अशी नाट्यकृति बाल-प्रेक्षकांसमोर ठेवणें अवघड जातें. त्यांच्या बालमनाच्या बालिश भावना कोणत्याहि कृतींत निर्माण झाल्या तरच तें त्यांना आवडतें. नाहींतर त्यांची नाकें मुरडण्याची व जांभ्या मारण्याची प्रवृत्ति जागी होते. पण हा अल्लड 'अल्लादिन' पाहिल्यावर मात्र बालकवर्ग बेहद खुष होतो. ह्याचे कारण म्हणजे त्याच्या आवडीची बीजें त्यांत असतात. बालरंगभूमीच्या या प्रयत्नामुळें बालरंग-भूमीच्या विकासाची दूर सागरतटीय दिवे लागण दिसत आहे. सौ. सुधा करमरकर यांच्या यशस्वितेबद्दल हार्दिक अभिनंदन ! त्यांना १०० प्रयोगाचें भाग्य लाभो, हीच शुभेच्छा !

—समिक्षा मधुकर

सात कथांतील सप्तरंगांनीं तुमच्या मनाला आनंद लाभेलच. कृपा करून तुमची आवड 'दीपावली'ला कळवा. तुमचें मत जरूर प्रसिद्ध करूं.




**दीपावलीकडे अभिप्रायार्थ पुस्तकें पाठवितांना नेहमीं २ प्रति पाठवा- व्यात म्हणजे निश्चित अभिप्राय देणें सोईचें होतें. १ प्रत असल्यास नुसती पोंच दिली जाते.**

**—संपादक**

## खगोलशास्त्रीय ज्ञान पारिजात

आमच्या भारत वैज्ञानिक प्रगतीच्या दृष्टीनें खूपच मागें आहे मग विज्ञान विषयावरील उपयुक्त माहितीनीं भरलेलीं पुस्तकें तीं येथें कुठून असणार! जीं कांहीं थोडीथोडकीं आहेत त्यांचा खप जेमतेमच. कारण तीं विकत घेऊन वाचणारे शौकीन जेवढ्यास तेवढेच. यामुळें विज्ञान विषयावरील पुस्तकें प्रकाशितहि कमीच होतात. असें असतानांहि सुप्रसिद्ध लेखक नि प्रकाशक श्री. रघुवीर सामंत यांनीं मात्र वरील शीर्षकाच्या शास्त्रीय ग्रंथनिर्मितीच्या बाबतीत धाडसच केलें आहे असें म्हणावेसें वाटतें.

'मी अनंत विश्वाचा रहिवासी' या नांवानें त्यांनी ज्ञान पारिजात नांवाच्या विज्ञान विषयक मालेचें पहिलें पुस्तक प्रकाशित केलें असून सदरहू पुस्तक खगोल शास्त्रावरील मौलिक ग्रंथ म्हणून म्हणावयास हरकत नाहीं. १७० पानांच्या ग्रंथात ग्रह, उपग्रह, तारे, सूर्यमाला, धूमकेतू, नक्षत्रें यांची अद्‌भुत, रंजक, शास्त्रीय अद्ययावत् माहिती सुलभ नि सोप्या भाषेंत दिली आहे व ती देतांना जास्तीत जास्त सचित्र, बहुरंगी अशी दिलेली आहे हें विशेष होय. पुस्तकांत उपयुक्त पारिभाषिक शब्दांची सूचीहि जोडलेली आहे. सारांश पुस्तक मेहनतीनें लिहिलेलें आहे. आंतील चित्रांच्या कल्पनेसाठीं कष्ट घेतलेले आहेत आणि आतां असें हें सुंदर निघालेलें पुस्तक खरेदिण्यासाठीं श्रमहि खर्चा पडणार आहेत.

शाळा खात्यानें, शिक्षण विभागानें यांनीं नव्हेच तर शाळाप्रमुखांनींसुद्धां या सुंदर पुस्तकाच्या जास्तीत जास्त प्रती खरेदी करून त्या विद्यार्थ्यांच्या हातीं द्यावशत, त्यांच्यांत विज्ञानविषयक साहित्याची अभिरुची उत्पन्न करावी आणि श्री. सामंतांना पुढील अशाच संकल्पित अशा बारा परड्यांना उत्तेजन द्यावें अशी आमची शिफारस आहे.

(**मी अनंत विश्वाचा रहिवासी** :–ले.– श्री. रघुवीर सामंत, प्रकाशिक :–स्नेहल सामंत, अमरज्योति प्रकाशन, १४ बी हरजीदास इस्टेट, दादर, मुंबई–१४.)

**—सदानंद चेंदवणकर**

## प्रतिमांचं वेड असलेली 'गंधवेणा'—

**गजमल** माळी यांचा हा पहिला काव्यसंग्रह. नव्या कवितेच्या साऱ्याखुणा यांत दिसून येतात. लोकविलक्षण प्रतिमा, दुर्बोधता, अर्थशून्यता, गहिरी धूसरता, वगैरे वैशिष्ट्यें, या काव्यसंग्रहांत जागोजागीं दिसून येतात त्यामुळेंच आजची नवकवीता सतत कांहींतरी समजावून घेण्याचा प्रयत्न करीत आहे हें प्रा. वा. ल. कुलकर्णी यांचें म्हणणें एका वेगळ्या अर्थी पटतं. मर्ढेकरांच्या कवितेतील प्रतिमासृष्टींत जो भावानुभव आणि वैज्ञानिक दृष्टिकोन यांचा मिलाप होता, त्याची पुरेशी जाणीव न झाल्यामुळें केवळ शाब्दिक प्रतिमांतच मर्ढेकरांचें महत्त्वमापन करणाऱ्यांनीं नव्या कवितेंत भलताच भ्रम पसरवून दिला. त्याचे दुष्परिणाम आतां दिसत आहेत. रामदासांच्या शिष्यांनी जसा रामदासांचा सर्वांत मोठा पराभव केला, तसा या नवागतांनीं मर्ढेकरांचा पराभव केला आहे.

'गजमल माळी'च्या संदर्भांत हा प्रपंच करण्याचें कारण इतकेंच कीं, त्यांच्या काव्यांत खरोखर अनुभवाचा वेध घेण्याची शक्ति आणि तो सफाईदारपणें काव्यांत उतरविण्याची कलात्मक प्रवृत्ति असूनहि प्रतिमा भ्रमामुळें त्यांची बहुतेक कविता बधीर झाली आहे. चंद्रफुलें, उषःपंख, कावळ्यांची शाळा, हिर्वाबारा आकाशाचा चुकार बगळा, गंधवेणा यासारख्या प्रतिमांचं वेड माळींना एवढं आहे कीं त्यासाठीं आशयाच्या संदर्भाकडे देखील ते दुर्लक्ष करतात. 'गया गोपिका राजा' 'शब्दामागें शब्द, 'मोळी' 'मनाचे श्लोक' यासारख्या कवितात मर्ढेकरांचं भ्रष्ट अनुकरण करण्याचा प्रयत्न आहे. 'विसरायाचें म्हणशील जेव्हां' यासारख्या कवितेंत पाडगांवकरांची दाट छाया आहे.

मर्ढेकर–रेग्यांपासून बापट–पाडगांवकरांपर्यंतच्या कवींची छाया या कवितासंग्रहांत वावरतांना दिसते. हा कवीचा दोष नव्हे. तशी सावली पडणं अपरिहार्य आहे आणि समर्थनीयही आहे. मर्ढेकरांसकट कोणताहि कवि सुरुवातीला त्यांतून सुटलेला नाहीं. पण—

'कोऱ्या शब्दांची पापणी
तरी मिटता मिटेना'
मुक्या जाणिवेची ओढ
कांहीं सुटतां सुटेना.'

या त्यांच्या ओळींत जें काव्य–सामर्थ्य आहे तें त्यांच्या

'क्षितिज उभें डोळ्यांत सांजतें
चंद्र उन्हाची नसांत शिंपण'

यासारख्या ओळींत निखालस नाहीं हें जरी त्यांना उमजलें तरी त्यांचा 'आणि त्यांच्या कविता वाचकांचा 'आत्म'विश्वास वाढेल असा माझा विश्वास आहे.

(**गंधवेणा**:–कवि गजमल माळी, मराठवाडा साहित्य परिषद प्रकाशन, मूल्य १.५०)

**—श्रीपाद भागवत (एम. ए)**

अनुक्रमणिका

